


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

ऑक्टोबर - २०१६





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७०। अंक १ । ऑक्टोबर २०१६
आश्विन/कार्तिक शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्‌मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका







# नवभारत

## ऑक्टोबर २०१६

## अनुक्रमणिका

# अब्दुल रहेमानकृत संदेशरासक

विजया लेले

संस्कृत साहित्याला दूतकाव्याची, संदेशकाव्याची खूप मोठी परंपरा लाभली आहे. संदेशकाव्य म्हटल्यावर सर्वप्रथम मेघदूत डोळ्यांसमोर येते; पण ही परंपरा खूप प्राचीन म्हणजे ऋग्वेदापर्यंत जाते. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलाच्या १०८ व्या सूक्तात सरमा नावाची कुत्री पणीकडे पाठविल्याचा उल्लेख आहे. रामायण व महाभारतात असे अनेक प्रसंग आहेत. महाभारतातील नलदमयंती उपाख्यानातील हंसदौत्यावर तर श्रीहर्षाने 'नैषधीयचरितम्' हे महाकाव्य लिहिले! तात्पर्य, दूताकरवी संदेश पाठविणे हा खूप लोकप्रिय काव्यप्रकार आहे!

संस्कृतप्रमाणेच प्राकृत भाषेतही दूतकाव्ये लिहिली गेली. त्यांपैकी एका मुसलमान कवीने बाराव्या शतकाच्या सुमारास लिहिलेले 'संदेशरासक' नामक एक आगळेवेगळे काव्य आपले लक्ष वेधून घेते. रास शब्दाची 'रसानां समूहः', रसः उत्पद्यते यस्मात्' अशी एक सामान्य, सर्वस्वीकृत व्याख्या आहे. रास शब्द संस्कृत व रासक हे त्याचेच प्राकृत रूप. त्यात थोडा तांत्रिक फरक आहे; पण तो तपशील येथे फारसा अपेक्षित नाही.

२२३ श्लोकांचे (श्लोक शब्द येथे ढोबळ अर्थाने वापरला आहे) हे काव्य तीन 'प्रक्रमां'त विभागलेले आहे. हे विभाग त्यातील कथावस्तूला अनुसरून केले आहेत. पहिल्या प्रक्रमात २३ श्लोक प्रास्ताविक स्वरूपाचे आहेत व त्यांत कवीने स्वतःबद्दल ब-यापैकी माहिती दिली आहे. काव्यरचनेविषयी स्वतःच्या ऊर्मीचे, वेगवेगळी उदाहरणे देऊन समर्थन केले आहे. दुस-या प्रक्रमात १०५ श्लोक आहेत. त्यांत नायिका व पथिक यांच्यातील संवाद, नगरवर्णन वगैरे विषय आहेत. शेवटच्या, तिस-या प्रक्रमात ९५ श्लोक आहेत व त्यांत षड्ऋतूंचे वर्णन व नायिकेने त्या काळातील विरह अत्यंत क्लेशाने कसा सहन केला, त्याचे वर्णन आहे आणि मुख्य म्हणजे काव्याचा परमोच्चबिंदू (climax) शेवटच्या श्लोकात फार सुरेख पद्धतीने साधला आहे!

ह्या काव्यास मेघदूताप्रमाणे अपभ्रंश भाषेतील एक खण्डकाव्य म्हणता येईल.

प्रथमप्रक्रमात काव्याच्या सुरुवातीलाच कवी अब्दुल रहेमान अव्यक्तरूप देवतत्त्वाचे विनयपूर्वक स्मरण करतो. 'रत्नाकर-गिरि-तरुवर-गगनाङ्गण-ऋक्षाणि' ज्याने निर्माण केली, त्या सृष्टितत्त्वाला विनयपूर्वक नमस्कार असो. तो आपणा सर्वांचे कल्याण करो.' त्यानंतर कवी स्वतःचा परिचय देतो. पश्चिम दिशेला म्लेच्छदेशात मीरसेन नावाच्या वीणकराच्या घरी त्याचा जन्म झाला. (त्याने आईच्या नांवाचा उल्लेख केला नाही. व 'मीर'सेन हे नाव 'तान'सेनप्रमाणेच असेल का?) (प्रतीच्यां दिशि पूर्वप्रसिद्धो म्लेंच्छनामा देशोऽस्ति। तत्र तन्तुवायो मीरसेनाख्यः सम्भूतः। तस्य कुलकमलः तनय अब्दुलरहेमानः प्राकृतकाव्ये गीतविषयेषु लब्धरेखः = प्रसिद्धः आसीत्। तेन संदेशानां रासकः नामऽपभ्रंश ग्रन्थः कृतः) त्यानंतर कवी पूर्वसूरींचे 'पूर्वच्छेकेभ्यः शब्दशास्त्रकुशलेभ्यः' विनयपूर्वक स्मरण करतो व मी जरी त्यांच्याइतका विद्वान नसलो तरी मी काव्य करू नये का? असा 'जरि राजहंसाचे चालणे' ह्या धर्तीवर अनेक उदाहरणे देऊन (जवळजवळ १५) स्वतःच्या काव्याविष्काराचे समर्थन करतो. (येथे कवीने भरतनाट्यशास्त्राचा उल्लेख केला आहे.) ह्या प्रक्रमाच्या शेवटी 'माझे काव्य मध्यमांसाठी आहे कारण पंडितांना ते अतिसामान्य वाटेल व मूर्खांना ते कळणार नाही असे सांगतो. (ये न मूर्खाः, न पण्डिताः अपि तु मध्यस्थाः तेषां पुरतः सर्वदैव पठितव्यम्।) ह्या रचनेचे त्याने 'अनुरागिणां रतिगृहम्, कामुकानां मनोहरम्, मदनमनस्कानां पथोदीपकम्, विरहिणीनां मकरध्वजम्, रसिकानां रससज्जीवनकरम्, विशुद्धकरम्, यतः अतिस्नेहेन भाषितम्, रतिमतिवासितम्, कर्णशष्कुल्योः यथा अमृतम्'। असे सुंदर अलंकारिक वर्णन केले आहे!'

दुस-या प्रक्रमापासून कथावस्तूला सुरुवात होते.










भारताच्या वायव्य दिशेस एक शहरवजा विक्रमपुर – विजयपुर नावाचे गाव (सध्या राजस्थानातील जेसलमीर-जवळ) आहे, तेथे ही विरहिणी नायिका राहते. रस्त्याने जाताना सहजच तिचे लक्ष एका पथिकाकडे जाते व ती त्याची चौकशी करते. येथे त्या पथिकाकडे उत्सुकतेने जातांनां तिची जी तारांबळ उडते, ती कवीने तीन श्लोकांत आपल्या डोळ्यांसमोर उभी केली आहे. तिचे सौंदर्य पाहून तो पथिक क्षणभर थबकतो व नंतर स्वतःला सावरून स्वतःची माहिती देतो. ४२ व्या श्लोकापासून जवळजवळ ७० व्या श्लोकापर्यंत तो स्वतःच्या प्रदेशाचे वर्णन करतो. मूलस्थान – मुलतान (आता पाकिस्तानात) येथील सामोर – सांबपुराहून तो आला आहे. तेथे जवळच तपनतीर्थ – सुर्यकुण्ड नावाचे खूप प्रसिद्ध तीर्थस्थान आहे. तेथून मी आलो आहे. जवळजवळ १५/१७ श्लोकांत सामोरचे फार सुंदर वर्णन केले आहे. तेथे सर्व सुसंस्कृत लोक राहतात. मोठमोठे प्रासाद, रमणीय उद्याने वगैरेंनी नटलेले हे शहर आहे. हे सर्व झाल्यावर तो स्वतःच्या स्वामीच्या, मालकाच्या आदेशानुसार लेखवाहक म्हणून 'स्तंभतीर्था'स (खंभात -गुजराथ) जात आहे, असे सांगतो. (समोरुपुरे तपनतीर्थं, सूर्यकुण्डम् प्रसिद्धम्, चतुर्दिक्षु व्याख्यायते। तन्मूलस्थानं प्रसिद्धम्। सर्वैः अपि नरायरैः ज्ञायते। ततोऽहं लेखवाहकः एकेन प्रेषितः प्रभ्वादिष्टो स्तम्भतीर्थे गच्छामि।) स्तम्भतीर्थ नाव ऐकताच ती विरहिणी नायिका कातर होते व माझा पती व्यापारासाठी तेथेच गेला आहे असे सांगते. त्याला माझा संदेश देशील का, अशी विनवणी करते. (स्तम्भतीर्थं नाम्ना मम शरीरं जर्जरितम्। तत्र विरहफेटको मम भर्ता वर्तते। हे पथिक यदि दयां कृत्वा क्षणार्धं पदं मोहयसि तदा किञ्चित् सन्देशकं प्रियाय तुच्छाक्षरैः जल्पामि। - - - संदेशकस्तु विस्तीर्णः, त्वमुत्सुकः गमनाय)

आणि ह्यानंतरचा, नायिकेला नायकाची–पुरुषांची, कामकाजासाठी दूर जाण्याची अपरिहार्यता समजावून सांगणारा श्लोक फार सुंदर आहे. तुझ्यासारखाच तो-सुद्धा विरहव्यथेने व्याकूळ होत नसेल का? नायकाची-सुद्धा बाजू मांडण्याची ही कल्पना खरंच नवीन वाटते! (प्रवासिनो बहुकर्मणि गच्छन्ति भ्रमन्ति च। अकृते निजप्रयोजने न वलन्ति, न व्याघुट्यन्ति। ते च विदेशे भ्रमन्तो मन्मथशरहताः निजगृहिण्याः स्मरन्तो विरहेण वशीकृताः - - - यथा यूयं तथा पथिका अपि क्षीयन्ते।)

नंतर पथिक खूप सहानुभूतिपूर्वक तिचे सांत्वन करतो व म्हणतो की, मी प्रवासास जात आहे तेव्हां तू असे अश्रू ढाळून मला अपशकुन करू नकोस. माझा प्रवास खूप लांबचा आहे व मार्ग खूप कठिण आहे. (व्रजतः पथि मम अमंङ्गलं मा कुरु, रुदित्वा, रुदित्वा.। त्वरितं कथय, सुर्यः अस्तं आयात। किं संदेशकं दास्यसि) नायिका प्रसंग सावरून घेते व विरहाग्नीच्या धुरामुळे डोळ्यांत पाणी आले, मी रडत नाही असे सांगते.

१३० व्या श्लोकापासून तिस-या प्रक्रमास सुरुवात होते. दुस-या प्रक्रमाच्या शेवटी तुझा पती कधी प्रवासास गेला असे विचारतो व ती ग्रीष्म ऋतूत असे सांगते. हा धागा पकडून कवी ग्रीष्मापासून सुरुवात करून, प्रत्येक ऋतुविशेषासह ऋतुंचे वर्णन करून ऋतुराज वसंताच्या वर्णनात काव्याचा शेवट करतो. रसराज शृंगारातील विप्रलम्भ शृंगार म्हणजे कवींचा आवडता विषय! हे वर्णन कवीने अत्यंत साध्या अलंकारांचा चमत्कृतिपूर्ण उपयोग करून अतिशय रंजक केले आहे. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, श्लेष, दीपक वगैरे. अलंकारांचे अकृत्रिम उपयोजन कवीच्या उत्कृष्ट प्रतिभेची साक्ष देते. (विस्तार-भयास्तव येथे त्याची अधिक चर्चा करणे शक्य नाही.) हे सर्व करताना काव्य कुठेही निरस, कृत्रिम होणार नाही ह्याची कवीने पुरेपूर दक्षता घेतली आहे. संपूर्ण काव्यभर सात्त्विकतेचा एक तरल भाव सतत जाणवतो.

ह्या काव्याचा शेवट अत्यंत अनपेक्षित, चमत्कृतिपूर्ण आहे. पथिकास, स्वतःच्या पतीला देण्यासाठी निरोप देऊन ती नायिका झरझर चालू लागते व सहजच दक्षिण दिशेकडे पाहते. तो काय? ज्याच्या विरहाने ती इतकी व्याकूळ झाली होती, ज्याला देण्यासाठी पथिकाबरोबर निरोप पाठविला होता तो नायकच, तिचा पती, तिच्या दृष्टीस पडला! व तिची अवस्था कुमारसंभवातील पार्वतीसारखी 'न ययौ न तस्थौ' झाली! (सा दीर्घाक्षी यावत्तं प्रेषयित्वा अतित्वरितं चलिता। अस्मिन्नवसरे दक्षिणा दिक् दृष्टा। तदैवासन्नं यथा पन्थानमावरयन् तया पतिःदृष्टः। हर्षिता झगिति जाता। - - - यथा चिन्तितं कार्यं तया क्षणार्धमध्ये महत् सिद्धं तथा पठतां शृण्वतां सिद्ध्यतु।)



अनुक्रमणिका

स्वतःचा परिचय देताना कवी मी कोणी पंडित नाही असे विनयाने म्हणतो परंतु तो संस्कृत व अन्य भाषांचा उत्तम जाणकार असला पाहिजे ही गोष्ट हे काव्य वाचताना पदोपदी जाणवते. सहसा प्रचारात नसलेले अनेक शब्द त्याने वापरले आहेत. उदा., सा/शालूर-बेडूक; अगस्ति नक्षत्र-वर्षाॠतु समाप्ता इति ज्ञायते; ऐरावती = विद्युत; माकन्द = आम्रवृक्ष अशी अनेक उदाहरणे देता येतील. महाभारत, रामायण, भरतनाट्य-शास्त्र, सदयवत्सकथा (आज ही गुजराथीत 'संदेवंतनी-कथा' म्हणून प्रसिद्ध आहे.), कांही राजस्थानी चालीरीतींचा उल्लेख - कुन्दचतुर्थी (१९८-९) एक म्हण - शृङ्गार्थं गर्दभी गता। पश्यु, कर्णौ हारितौ। हे सर्व उल्लेख कवीची बहुश्रुतता दाखवितात. अपभ्रंश भाषेच्या स्थित्यंतराच्या दृष्टीने हे काव्य महत्त्वाचे आहे.

हे काव्य ऐतिहासिक आणि भौगोलिक दृष्ट्या खूप महत्त्वाचे आहे. मूलस्थान - मुलतान तपनतीर्थ - सुर्यकुंडाचा उल्लेख खूप महत्त्वाचा आहे. काव्यातील वर्णनावरून हा प्रदेश अतिशय सम्पन्न होता असे दिसते व इतिहास तेच सांगतो. वायव्य दिशेस मुसलमांनांची आक्रमणे सुरू झाली होती, पण त्यांचा फारसा प्रभाव नव्हता. सुलतान महम्मद उर्फ शहाबुद्दीन घोरीने दिल्लीच्या तख्तावर ताबा मिळविण्याच्या आधीचा तो काळ असावा. प्रो. हरिवल्लभ भायाणींच्या मते सिद्धराज जयसिंह किंवा कुमारपालाच्या शासनाच्या आसपास म्हणजे १२ व्या शतकाचा उत्तरार्ध किंवा तेराव्या शतकाची सुरुवात - ह्या दरम्यान वायव्येकडून गुजरातमधील महत्त्वाचे बंदर खंभात (स्तंभतीर्थ) मध्ये व्यापारउदीमाची भरभराट होती, त्याच सुमारास ह्या काव्याची रचना झाली असावी.

महम्मद इब्न कासीमने प्रतिहारांकडून मुलतानचा प्रदेश जिंकला व मुस्लिम राज्य स्थापन केले. पंजाब-मधील मुलतान हा प्रदेश हिंदू देवदेवतांच्या मंदिरांसाठी खूप प्रसिद्ध होता. कनोजच्या प्रतिहारांनी हा प्रदेश परत मिळविण्याचा खूप प्रयत्न केला, पण ते मिळवू शकले नाहीत. प्रतिहारांचे सैन्य जवळ आले की, हे राज्यकर्ते मूर्ति व मंदिर उद्ध्वस्त् करण्याची भीती घालीत व सैन्य माघारी जाई. ह्या सूर्यमंदिराचा उल्लेख चिनी प्रवाशांनीसुद्धा केला आहे. (आज पाकिस्तानात हे मंदिर शिल्लक आहे का नाही, ते जाणण्याची खूप उत्सुकता आहे!)

इतके महत्त्वाचे काव्य जरा दुर्लक्षितच का राहिले, ह्याचे आश्चर्य वाटते।

ह्या काव्याबद्दलचे डॉ. हंरिवल्लभ भायाणींचे मत बरेच कांही सांगून जाते.

This seems to be the only non-religious metrical literary work, coloured in Vernacular Apabhramsha Language. It is a unique work of its type by a muslim poet.

(ह्या काव्यावर 'टिप्पनक' व 'अवचूरि' अशा दोन संस्कृत व्याख्या उपलब्ध आहेत. हा लेख त्यांच्यावर आधारित आहे.)

***

# 'दबिक'मध्ये इस्लामिक स्टेट (भाग-२)
## सारांश पहिल्या अंकाचा

मुकुल रणभोर

**प्रस्तावना –**

'दबिक' म्हणजे नेमकं काय आहे ते गेल्या लेखात आपण पाहिलं. त्याचं एकूण स्वरूप कसं आहे, कोण वाचक समोर ठेवून मासिकांची निर्मिती ते करत आहेत, हे पाहिलं. 'दबिक'चा इतिहास, आताची थोडक्यात परिस्थिती असं सर्व आपण मागच्या लेखात पाहिलं. सर्व अंक समजावून घेण्यासाठी लागणारी सर्व पार्श्वभूमी आपल्याला आता माहीत आहे, तेव्हा आता मूळ अंकांच्या अभ्यासाकडे वळता येईल. पहिला अंक एकूण पन्नास पानांचा आहे. अभ्यास करताना सुरुवातीला माझी कल्पना होती की, प्रत्यक्ष अंकांचे मराठी भाषांतर करावे. पण त्याचा आवाका लक्षात आल्यावर मी ठरवलं की, ज्यांना अधिक जिज्ञासा असेल ते मूळ वाचतीलच. आपण अंकांचा सारांश सांगावा. पहिले दोन अंक वाचल्यानंतर माझ्या लक्षात आलं की, केवळ सर्व अंकांचा सारांश-सुद्धा सांगणे एका लेखात शक्य नाही. म्हणून आता ह्या लेखात पहिलाच अंक विचारात घेतला आहे. पुढच्या काही लेखांत पुढचे अंक काय म्हणतात, ते विचारात घेतलं जाईल. प्रत्यक्ष अंकांचे स्वरूप कसे आहे, याचा अंदाज यावा म्हणून हा खटाटोप सुरू आहे.

**विस्तार —**

गेल्या लेखाच्या शेवटी पहिल्या अंकाचा थोडक्यात परिचय केलेलाच आहे. तो लेखाच्या सलगतेसाठी पुन्हा सांगणे आवश्यक आहे. या पहिल्या अंकाची कव्हर स्टोरी आहे – 'The Return of the Khalifah'. जगाच्या नकाशावर इराक, सिरीया, सौदी अरीबिया या देशांवर 'The Return of the Khalifah' अशी अक्षरे लिहिलेलं एक ग्राफिक हे ह्या अंकाचे मुखपृष्ठ आहे. अंकाचा मुख्य हेतू 'आता जगात मुसलमानांसाठी धार्मिक आणि राजकीय नेतृत्व निर्माण झालं आहे', हे सांगणे हाच आहे. आता जगात कोणत्याही मुसलमानाने खाली मान घालून जगण्याची गरज नाही; कारण त्यांना हक्क आणि सन्मान पुन्हा मिळवून देण्यासाठी 'खिलाफत' स्थापन झाली आहे.

अंकात अगदी सुरुवातीला मासिकाचे नाव 'दबिक' हेच का निवडण्यात आले आहे, ते सांगण्यात आले आहे. ते सांगण्यासाठी 'सहिह मुस्लीम' यांनी संकलित केलेल्या एका 'हादीस'चा संदर्भ देण्यात आलेला आहे. 'दबिक'चा अर्थ आपण मागच्या लेखात पाहिला. तो पुन्हा सांगण्याची गरज नाही. या अंकात खिलाफतीची स्थापना झाली आहे, औपचारिकपणे जाहीर करण्यात आलं आहे. हिजरी १४३५ च्या रमजानच्या पहिल्या दिवशी अल्लाहच्या कृपेने खिलाफतीची स्थापना करण्यात आली आहे, असं इस्लामिक स्टेटच्या प्रवक्त्यांनी जाहीर केलं. ते जाहीर केल्यानंतर राज्याच्या रस्त्यारस्त्यांवर आनंद साजरा करण्यात आला, असंही लिहिलेलं आहे.

खिलाफतीच्या स्थापनेदिवशी नवीन खलिफा 'अमीरुल-मू-मूमीन अबू बक्र अल-हुसैनी अल कुरैशी अल-बगदादी' यांचे भाषण झाले. हा खलिफा आत्तापर्यंत एकदाच जगासमोर आलेला आहे. (अनेकदा अशा वावड्या उठत असतात की, अमेरिकेच्या हवाई हल्ल्यांमध्ये तो मारला गेला, पण अजून एकदाही अधिकृत रीत्या हे जाहीर झालेलं नाही.) ते त्याचे अरबीमध्ये केलेलं पूर्ण भाषण अनेक दिवस You tube वर उपलब्ध होतं. दहशतवादाला खतपाणी घालणारे ते असल्यामुळे पूर्ण भाषण तिथून काढून टाकण्यात आले आहे. त्याच्या भाषणाचे छोटेछोटे तुकडे शिल्लक आहेत. पहिल्या अंकात त्या खलिफाच्या भाषणाचा काही संपादित अंश देण्यात आला आहे. ते सांगणे आवश्यक आहे. (फक्त मुद्दे सांगतो आहे.)

१. अल्लाहच्या कृपेने -- आता तुम्हाला (मुसलमानांना) तुमचे राज्य आणि खलिफा लाभलेला

अनुक्रमणिका








आहे. ज्यामुळे तुम्हाला तुमचा सन्मान, हक्क आणि नेतृत्व पुन्हा प्राप्त होईल.

२. हे असं राज्य असेल की, जिथे अरब-गैर अरब, काळे-गोरे, पाश्चिमात्य-पौर्वात्य सर्व एकमेकांचे बंधू असतील.

३. कॉकेशियन, इंडियन, चायनीज, सिरीया, इराक, येमेन, इजिप्त, उत्तर आफ्रिका, अमेरिका, जर्मन, फ्रान्स, ऑस्ट्रेलिया इ. देशांतील लोक एकत्र येऊन ही खिलाफत स्थापन झाली आहे.

४. अल्लाहच्या कामासाठी वेगवेगळ्या देशांतील लोकांची मनं एकत्वाच्या भावनेने भरून गेली आहेत. अल्लाहच्या कार्यासाठी एकमेकांच्या संरक्षणासाठी आणि एकमेकांसाठी ते भावाच्या नात्याने एकत्र आले आहेत.

५. एका झेंड्याखाली, एका ध्येयासाठी, एका तंबूत आलेले एकत्वाचा आशीर्वाद अनुभवत आहेत.

६. मुसलमानांचा हक्क आणि सन्मानासाठी हा नवीन काळ सुरू होतो आहे.

७. अल्लाहच्या परवानगीने – लवकरच असा दिवस येईल, जेव्हा मुसलमान सर्वत्र 'अधिकारी' (as a master) म्हणून वावरतील. त्यांना त्यांचा सन्मान पुन्हा प्राप्त होईल.

८. कोणीही त्यांच्या वाटेला जाऊ शकणार नाही. त्यांना इजा पोचवण्यासाठी उठलेला प्रत्येक हात तोडला जाईल. जगाला कळू द्या की, नवीन युग सुरू होते आहे.

९. जे कोणी बेसावध असतील ते सावध व्हा, झोपले असतील त्यांनी जागे व्हा. आश्चर्यचकित झालेल्यांनी समजून घ्या की, मुसलमानांना आता आवाज मिळाला आहे.

१०. 'दहशतवाद' म्हणजे काय हे आम्ही जगाला शिकवू. खोट्या राष्ट्रवादाच्या मूर्ती आम्ही फोडू, लोकशाहीच्या मूल्यांचंही तेच होईल.

खिलाफतीच्या स्थापनेनंतर जग पुन्हा एकदा दोन गटांत विभागलं गेलं आहे. मूळ अंकातील शब्द आहेत – पहिला गट इस्लाम आणि 'फेत' (श्रद्धावानांचा) आणि दुसरा गट आहे कुफ्र आणि 'डीसबिलिफ' (श्रद्धाहीनांचा). ह्याच परिच्छेदात हे स्पष्ट केलं आहे की, एक गट आहे मुसलमानांचा आणि दुसरा आहे ज्यू, क्रुसेडर, त्यांचे साथी आणि त्यांच्याबरोबर इतर सर्व धर्मांचे लोक.

यानंतर महत्त्वाचा मुद्दा आहे केलेले 'हिजरतीचे' आवाहन. सर्व मुसलमानांना आपापल्या प्रदेशातून इस्लामच्या भूमीकडे (म्हणजे इस्लामिक स्टेटकडे) हिजरत म्हणजे स्थलांतर करून येण्याचे आवाहन केले आहे. त्याचबरोबर वेगवेगळ्या विषयांतल्या 'तज्ज्ञ' लोकांना-सुद्धा इस्लामिक स्टेटकडे हिजरत करून येण्याचे आवाहन केले आहे. त्यात डॉक्टर, इंजिनीअर, स्कॉलर इ. लोकांना बोलावले आहे.

पुढचा विषय आहे, इस्लामिक स्टेट रिपोर्ट. ('दबिक' ज्या संस्थेतर्फे प्रकाशित केलं जातं, ती अल-हयात याचं संस्थेतर्फे 'इस्लामिक स्टेट रिपोर्ट' या नावाने आठ-दहा पानांचा एक अहवालसुद्धा प्रकाशित होत होता. त्याचे ५ अहवाल प्रकाशित झाले आहेत. त्यात मुख्यतः बातम्या आणि मुलाखती इतकंच असतं.) त्यामध्ये इस्लामिक स्टेटच्या अधिकारक्षेत्रात येणा-या अरब टोळ्यांशी संबंध निर्माण करण्याची इस्लामिक स्टेटची भूमिका आहे (अर्थात त्या टोळ्या धर्माने मुसलमानच आहेत.), असे सांगण्यात आले आहे. अशा चार टोळ्यांची नावं पहिल्या अंकाच्या या रिपोर्टमध्ये सांगितली आहेत. त्यामध्ये 'अबू-खमीस', 'बनू-सईद', 'अल-आवान' आणि 'अल-घामीन' या चार टोळ्यांच्या श्रेष्ठींबरोबर इस्लामिक स्टेटच्या अधिका-यांच्या बैठका झाल्या. त्यामध्ये इस्लामिक स्टेटचे ध्येय हे प्रांतिक किंवा प्रादेशिक नसून जागतिक आहे, हे त्यांना समजावून सांगण्यात आले. टोळयांच्यासुद्धा मूलभूत गरजा इस्लामिक स्टेटकडून पूर्ण केल्या जाव्यात, अशी अपेक्षा टोळ्यांकडून करण्यात आली. त्या मान्य करून इस्लामिक स्टेटने त्यांचा पाठिंबा मागितला. अरब टोळ्यांनी आपल्या तन, मन, धनासकट इस्लामिक स्टेटला मदत करण्याचे आवाहन करण्यात आले. त्यांच्या पाठिंब्याच्या बदल्यात इस्लामिक स्टेट पुढील सेवा या टोळ्यांना पुरवेल, असे जाहीर करण्यात आले आहे–

१. ख-या मालकाला त्याची मालमत्ता आणि हक्क यांची परतफेड.

२. मुसलमानांसाठी उपयुक्त ठरतील अशा सर्व सेवांच्या नियोजनासाठी पैशाची तरतूद.

३. इस्लामिक स्टेटच्या अधिकारात असलेल्या प्रदेशात शांतता व स्थैर्य.

४. अन्न आणि कमाड्टिीज यांचा खात्रीलायक पुरवठा.

५. गुन्हेगारीचे प्रमाण कमी करण्यावर भर.

६. जनता आणि राज्यशासन यांच्यात मैत्रीपूर्ण संबंध निर्माण करण्यावर भर.

या सेवांच्या बदल्यात टोळ्यांनी इस्लामिक स्टेटला काय काय सहकार्य करायचं —

१. जकात गोळा करून, वसुली अधिका-याकडे पोचवणे.

२. अनाथ, विधवा आणि गरजू लोकांची यादी तयार करणे, जेणेकरून गोळा केलेली जकात त्यांच्यासाठी वापरण्यात येईल.

३. टोळ्यांनी तरुणांना इस्लामिक स्टेटच्या प्रशासनात जाण्यासाठी प्रोत्साहन द्यावे.

४. इस्लामिक स्टेटविरुद्ध उभे राहणा-या गटांना विरोध केला पाहिजे.

यानंतर अंकात 'तल अफार' हे शहर इस्लामिक स्टेटने मुक्त केल्याची बातमी आहे. त्यामध्ये लिखित मजकूर कमी आहे, परंतु ह्या योजनेचे फोटो मात्र टीमने भरपूर वापरलेत. (आपल्याला) अतिशय अमानुष वाटणारे फोटोसुद्धा टीमने बिनदिक्कत वापरले आहेत. ह्याच अंकामध्ये नव्हे, तर हे सर्व मासिकाचेच वैशिष्ट्य आहे, की केलेल्या कत्तलींचेसुद्धा अनेक फोटो कोणत्याही संकोचाशिवाय त्यांनी वापरले आहेत.

यानंतर पहिल्या अंकातील पहिला विशेष लेख. पुन्हा पूर्ण लेखाचे मराठी भाषांतर करणे आणि सांगणे कठीण आहे. तेव्हा त्याचा सारांश सांगतो. पहिला लेख आहे 'इब्राहीम (म्हणजे अल-बगदादी) याच्या शब्दांत नेता म्हणजे काय?' आणि ज्याप्रमाणे एखाद्या दागिन्यावर गंज चढतो, त्याप्रमाणे माणसाच्या श्रद्धेवरसुद्धा गंज चढतो, तो गंज काढून टाकून नव्याने माणसाने सुरुवात केली पाहिजे असे अल्लाहने सांगितले आहे, ह्या अर्थाची आयत कुराणमध्ये आहे त्याचा संदर्भ येथे देण्यात आला आहे. 'इस्लामिक स्टेट'चा हा चढलेला गंज दूर करण्याचा प्रयत्न आहे. अल-बगदादीने दाखवलेला रस्ता अनेक तरुण मुस्लिमांना दिशादर्शक बनला आहे. इब्राहीमने सांगितलेल्या मार्गावर त्यांनी श्रद्धा ठेवली, तर त्यांच्या श्रद्धेवरचा गंज दूर होईल, असा एकूण ह्या लेखाचा सूर आहे. ज्यांनी या मार्गावर श्रद्धा ठेवली, त्यांच्यासाठी काम केलं, धर्माचा अभ्यास आणि आचरण केलं अशा लोकांनी दाखवलेल्या रस्त्यावर ते दिशाहीन मुस्लीम मार्गक्रमण करत आहेत. इतरांनीही कुराणमध्ये सांगितलेल्या मार्गावरून चालावं, असं आवाहन सर्वांनाच केलेलं आहे. इस्लामच्या दृष्टीने 'बुडती हे जन देखवेना डोळा' ही या लेखाची भूमिका आहे. जगाच्या सर्व भागांत ह्याचे प्रतिध्वनी उमटले आहेत. अनेक मुस्लीम त्याच्याकडे आकर्षित झाले. अनेक ठिकाणी मस्जिद किंवा इतर इस्लामिक संस्थांमध्ये एकत्र येऊन त्यांनी इस्लामिक स्टेटबद्दलच्या आपल्या भावना युरोपीय भाषांमध्येसुद्धा व्यक्त केल्या, असे लिहिण्यात आले आहे.

'नेता म्हणजे काय?' या लेखाचे ५ भाग आहेत. 'दबिक'या मासिकाचं हे एक वैशिष्ट्य म्हणता येईल की, एक गाभ्याचा विषय आणि त्यावर त्याचे मुख्य पैलू सांगणारे ५ उप-विषय. बहुतेक सर्व अंकांमध्ये असे एका मुख्य विषयाचे पाच भाग केलेले आहेत. पहिला भाग थोडक्यात काय आहे, हे वर सांगितले. दुसरा भाग मुख्यतः हा आहे, की हे जे नवीन नेतृत्व निर्माण झालेलं आहे, ते एकाच वेळी धार्मिक आणि राजकीय नेतृत्व आहे. गेल्या लेखाच्या शेवटी सांगितल्याप्रमाणे स्वतः प्रेषित पैगंबर हे सर्व क्षेत्रांतले अधिकारी होते. इस्लाममध्ये राजकारण आणि धर्मकारण हे एकमेकांपासून वेगळे काढता येत नाहीत. त्यामुळे 'सेक्युलरिझम' ही धर्मविरोधीच कल्पना असल्याचं यात लिहिण्यात आलं आहे. त्यासाठी कुराण आणि हादीसमधलेसुद्धा संदर्भ देण्यात आले आहेत. शरीया आणि प्रशासन वेगवेगळे आहे, 'कुराण' केवळ पठणाचे पुस्तक आहे आणि त्याचा आणि प्रशासन, कायदेमंडळ, न्यायव्यवस्था यांचा संबंध नाही असं म्हणणारे धर्मद्रोहीच आहेत, असं यात लिहिण्यात आलं आहे. असं म्हणण-यांनी एकदा इस्लामचा अभ्यास करावा, असंही त्यात सुचवण्यात आलं आहे.

लेखाच्या सर्व भागांपैकी सर्वांत मोठा भाग हाच आहे. आधीच्या सर्व भागांत कुराण, हादीस आणि

शरीयानुसार इस्लामिक राज्याने कोणकोणत्या अटींची पूर्तता करणे आवश्यक असते, साधारण ते दिलेले आहे. या शेवटच्या भागात त्या सर्व अटी 'हे' इस्लामिक स्टेट पूर्ण करतं, त्यामुळे हेच खरं इस्लामिक स्टेट आहे. या अंकात म्हणण्यात आलं आहे की, *'This is the khilafah on the prophetic methodology.'* ज्याप्रमाणे कुराण, हादीस आणि पैगंबर यांना अपेक्षित आहे, त्याचप्रमाणे ही खिलाफत आहे.

सर्व अंकामध्ये असलेला महत्त्वाचा भाग म्हणजे 'The Islamic state in the words of enemy'. पाश्चात्त्य (म्हणजे मुख्यतः क्रुसेडर) जग इस्लामिक स्टेटबद्दल काय काय विचार करतं, हे यात सांगण्यात येतं. अर्थात दबिकची टीम 'इस्लामिक स्टेट'च्या दृष्टीने अन्वयार्थ लावून ते सांगत असते. अमेरिका-इराक राष्ट्रीय सुरक्षा परिषदेचा सदस्य डग्लस ऑलिव्हॅट आणि अमेरिकेच्या वेस्ट पॉइंट ॲकॅडमीमध्ये दहशतवादविरोधी विषयांचे संशोधन करणारा ब्रायन फिशमन अशा दोन अमेरिकन क्रुसेडर्सनी लिहिलेल्या एका लेखातील संपादित अंश देण्यात आला आहे.

या अंकातला सर्वांत महत्त्वाचा लेख म्हणजे 'From Hijrah to khilafah.' महत्त्वाचा अशासाठी की, या लेखात जगातील सर्व मुसलमानांना खिलाफतीपर्यंत येण्याची पद्धत सांगितली आहे. जगाच्या कोणत्याही भागातून इस्लामिक स्टेट म्हणजे खलिफाकडे येण्याचे मार्ग सांगितले आहेत. भारतातूनही अनेक मुसलमान सिरीया आणि इराकमध्ये गेले, ते या मार्गावरून गेले का? हे तपासून घेतलं पाहिजे. तसं असेल तर पुढे असे होऊ नये यासाठी काही खबरदारी घेता येईल.

या लेखात म्हटले आहे की, अनेक ठिकाणी त्या त्या देशातील राज्यकर्ते मुसलमानांना हिजरत करण्याची परवानगी देत आहेत. पण अनेक ठिकाणी सेक्युलर, राष्ट्रवादी सरकारं अडथळा आणत आहेत, तेथील मुसलमानांना त्यांच्याशी लढूनच हिजरत करावी लागेल. काफिरांशी लढल्याशिवाय हिजरत होऊ शकत नाही. त्यामुळे 'जिहाद' हाच एकमेव मार्ग आहे 'हिजरतीचा.' ज्या देशातून अशा स्थलांतराला पाठिंबा मिळणार नाही, त्या देशात 'मुजाहिदीनांनी' जास्तीत जास्त अशांतता निर्माण करण्याचे प्रयत्न करून हिजरत केली पाहिजे. अशांतता निर्माण करून त्या देशातील प्रशासनव्यवस्था कमकुवत करणे आणि निर्माण होणा-या राजकीय पोकळीमध्ये शिरणे हा 'हिजरत' आणि 'जिहाद' करण्याचा मार्ग सांगितला आहे. त्या जिहाद करण्यामुळेच खिलाफत अधिक ताकदवान होईल, असं यात म्हणण्यात आलं आहे. अशा प्रकारचे अनेक action points या लेखात सांगण्यात आले आहेत. सांगितलेला हा रस्ता म्हणजे 'This has always been the roadmap towards khalifah for the mujahidin' असं सांगण्यात आलं आहे.

अंकाच्या शेवटी, इस्लामिक स्टेटने सुरुवातीच्या काही काळात भरपूर मोठ्या भागावर ताबा मिळवला, ज्या अनेक शहरांवर ताबा मिळवला त्याच्या बातम्या आहेत. अनेक फोटो वापरून पुढची पानं सजवली आहेत. पहिल्या अंकाच्या शेवटच्या पानावर पुन्हा एकदा तो 'दबिक'चा उल्लेख असलेलं हादीस देण्यात आलं आहे.

**माझं निरीक्षण —**

हा इस्लामिक स्टेटचा पहिलाच अंक असल्याने 'इस्लामिक स्टेट'च्या काही मूलभूत संकल्पना यात स्पष्ट केल्या आहेत. ह्या नवीन राज्याची नुकतीच सुरुवात असल्याने जगातील लोकांनासुद्धा इकडे येण्याचे आवाहन केले आहे, जेणेकरून सर्व क्षेत्रात हे राज्य विस्तार पावू शकेल. राजकीय आणि धार्मिक असे एकत्र नेतृत्व आपण देतो आहेत, असा त्याचा दावा आहे. इस्लामिक स्टेटच्या अधिकारात असलेल्या अनेक टोळ्यांना मिळणारे फायदे त्यांनी मुद्दाम अधोरेखित केले आहेत. त्या टोळ्यांनी आपले सहकार्य तर जाहीर केलेच आहे, तरी पुन्हा त्यांनी काय काय मागितलं आणि त्यांना आम्ही काय काय देणार, हे पुन्हा सांगण्याची गरज काय? तर सोपं आहे, की इतरांनी ते वाचावं आणि त्यावर विचार करावा, आणि जमल्यास आपलासुद्धा पाठिंबा इस्लामिक स्टेटला जाहीर करावा. त्यांनी हिजरतपासून खिलाफती-पर्यंतचा शास्त्रीय मार्ग दाखवला आहे, याचा अर्थ कोणीतरी माथेफिरू हे राज्य चालवत नसून, बुद्धिमान लोक

त्यांच्याकडे आहेत, हे यातून स्पष्ट होते.

प्रत्येक अंकाचा सारांश सांगणे म्हणजेसुद्धा दोन-दोन हजार शब्दांचा एक लेख होतो आहे. त्याचा व्याप खूप वाढतो आहे. म्हणून माझा आता हेतू इतकाच आहे, की मराठी वाचकांना 'दबिक' या मासिकाची अभ्यासासाठी ओळख करून द्यावी. 'इस्लामिक स्टेट'चे सर्व विचार अधिकृततपणे जगाच्या कानाकोप-यांत या मासिकाच्या माध्यमातून पोचत आहेत. तेव्हा याचा अभ्यास झाला पाहिजे.

* * *












# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ७

श्री. के. वनपाल

१९९८ मध्ये मी नाशिकला 'आदिवासी विकास महामंडळा'चा महाव्यवस्थापक म्हणून कारभार स्वीकारला होता. मंडळाचं काम मोठं अवघड होतं. आदिवासी लोकांच्या जमिनीतून निघालेल्या शेतीच्या २६ प्रकारच्या उत्पन्नांना रास्त भाव मिळावा म्हणून मंडळाने त्या विकत घेऊन साठवायच्या; म्हणजे व्यापारी त्यांना फसवणार नाहीत. शिवाय जंगलातील हिरडा, बेहडा, डिंक, मध वगैरे. अनेक प्रकारच्या वस्तूही मंडळानेच विकत घेऊन त्यांची साठवण करायची आणि जेव्हा भाव वधारतील तेव्हा विक्री करायची, अशी कल्पना होती. पहाडी भागातील ब-यापैकी गावात वखारी घालून ही साठवण केलेली असे. या वस्तूंचे साठे कुठे, किती आहेत याची माहिती मंडळाच्या कचेरीत असे. भाव वधारले की, त्या त्या वस्तूंचे किंवा पिकांचे लिलाव नाशिकमध्येच लावून आणि आपलीच माणसे त्या लिलावात चढाओढीत उतरवून मी लिलाव करीत असे.

एकदा तर गव्हाचा सर्व साठा नाशिकमध्येच आणून आणि गावात निरनिराळ्या ठिकाणी एक-दोन दिवसांपुरत्या जागा भाड्याने घेऊन मी तो गहू विकला होता. त्यातून मंडळाला बराच फायदा झाला होता. लोकही खूश होते; कारण मंडळाने विकलेल्या गव्हाचा भाव बाजारभावापेक्षा किलोमागे एक-दोन रुपयांनी कमी होता. यात मंडळाचा फायदा असा होता की, एरवी जो गहू सडून गेला असता, तो वाचला होता.

या काळात ब-याच व्यापा-यांची आणि त्यांच्या उद्योगांची माहिती मला होत होती. एक व्यापारी गवत विकण्याचाच व्यवसाय करत होता. तो मला सल्ला देत होता की, मंडळाने आदिवासी बांधवांचे गवत विकत घेऊन ते बाजारात विकावे. मी मात्र हा सल्ला फेटाळला. कारण माझ्या आधीचा आदिवासी विकास महामंडळाचा अधिकारी याने हा उद्योग केला होता आणि त्यात त्याच्यावर बालंट आले होते. हा प्रस्ताव मी का धुडकावला होता हे त्या व्यापा-याला पटले होते. तो मला नंतरही मधूनमधून भेटून जात असे.

असेच एक निवृत्त झालेले जनावरांचे डॉक्टर मला येऊन भेटून जात असत. जनावरांचे आरोग्य, व्यवस्थापन, जनावरांच्या निरनिराळ्या जाती यांची माहिती ते देत असल्याने ते भेटले की, मला आनंद व्हायचा. कोंबडीच्या खाद्यासाठी महामंडळाकडील वाया गेलेलं धान्य ते उचलून नेत असत.

मी एकदा त्यांना विचारले, "रिटायर केव्हा झालात?"

"झाली ३ वर्षे."

"मूळ कुठले?"

"जळगावजवळच्या एका खेड्यात माझी शेती."

"मग त्या शेतीत काय करता?" हा माझा नेहमीचाच प्रश्न."

"आता काही नाही. विकली.

"का? जमत नव्हती? कोणती पिकं घेत होतात? तुम्हाला शेतीत रस असणारच आणि खानदेशातील शेती म्हणजे सोन्याची शेती. ती विकली कशासाठी?"

"ते खरं. पण शेतक-याला कोण कसं कुणीकडे नेईल, त्याचा नेम नाही. माझंही तसंच झालं."

"तुम्ही जनावरांचे डॉक्टर; शेतीचं ज्ञान तुम्हाला असणारच. मग तुम्हाला कोण फसवणार?"

"तसं फसवलं नाही कुणी. पण शेतक-यांचं काही खरं नसतं. तो कुणाच्या तरी आहारी जातो आणि जातो भरकटत! माझं तसं काहीसं झालं."

"सविस्तर सांगा ना."

"तुम्हाला दोन-चार तासांचा वेळ काढता येईल का? त्या वेळी माझ्या गाडीतनं एका ठिकाणी जाऊ. जाताना काही माहिती सांगेन आणि तिथे पोचल्यावर

बाकीचं आपोआप समजेल. आत्ता एवढंच पुरे."

डॉक्टरांच्या चेह-यावरचे भाव बदलत गेले. आज त्यांना काही सांगायचे नव्हते, हे स्पष्ट दिसत होते. तेव्हा आता आणखी ताणायला नको म्हणून "येतो पुन्हा" असं त्यांनी म्हटल्यावर मी त्यांना निरोप दिला.

(१)

पुढच्या आठवड्यात डॉक्टरांच्या म्हणण्याप्रमाणे सकाळची अगदी लवकरची वेळ साधून आम्ही ते म्हणत होते त्या प्रवासाला निघालो. आम्ही नाशिक सोडून १०/११ किलोमीटर प्रवास केला. रस्ता अगदी खराब लागला. दोन-चार खड्डे लागल्यावर ते म्हणाले, "हे आत्ता खड्डे लागून जितका त्रास झालाय ना, तितकाच त्या व्यवसायात मला त्रास झालाय. आता आणखी खड्डे लागतील; पण करा माझ्याबरोबर सहन."

"म्हणजे, असा कुठला व्यवसाय तुम्ही करता आहात?" – मी.

"कुक्कुटपालन." – डॉक्टर.

"मग तर तो चांगलाच व्यवसाय आहे की! दररोज ताजा पैसा! थोडी काळजी घ्यावी लागते; पण साधला तर या व्यवसायासारखा व्यवसाय नाही." – मी.

"हे असं असतं बघा. ऐकीव माहितीवर विसंबून आपण कोणत्याही धंद्याला चांगलं-वाईट म्हणतो. पण प्रत्येक व्यवसायात साधणं किंवा बुडणं हे आलंच.". -- डॉक्टर.

मी समजून चुकलो की, डॉक्टरांना हा व्यवसाय म्हणा किंवा धंदा म्हणा, जमलेला दिसत नाही. थोडासा गप्प झालो. उगीच खपली काढायला नको.

जरा वेळानं शांततेचा भंग करत डॉक्टरांनी सुरुवात केली. "अहो, एकुलता एक मुलगा. माझ्याच खात्यात 'लाइव्ह स्टॉक सुपरव्हायजर' म्हणून लागला. मी रिटायर झाल्यावर गावी जाऊन शेती करत होतो. १० एकर केळीची बाग आणि इतर थोड्या जागेत घरी लागणारं धान्य वगैरे. अगदी छान चाललं होतं माझं. पण एके दिवशी मुलगा घरी आला. पहिल्या दिवशी काही बोलला नाही. गोडधोड करून आम्ही आपला पहिला दिवस घालवला. दुस-या दिवशी त्यानं मला आमच्या घराच्या ओसरीवर बसवून घेतलं."

डॉक्टर मुलाचं बोलणं सांगू लागले. तो म्हणाला, "बाबा, जरा बोलायचंय. नीट समजावून सांगतो." त्यानं एक कागदाची गुंडाळी उलघडली. कुक्कुटपालनासाठी लागणा-या २/४ शेडचा तो नकाशा होता. शिवाय बरोबर कुक्कुटपालनासाठी लागणारी सगळी माहिती असणा-या प्रोजेक्टची एक भलीमोठी वही त्यानं माझ्या पुढं धरली. मग तो म्हणाला "बाबा, अगदी सखोल अभ्यास करून मी प्रोजेक्ट बनवला. व्यवस्थित केला तर नाशिकच काय पण मुंबईचं मार्केटही आपण काबिज करू. हा व्यवसाय उभा करायला जास्तीत जास्त ६ ते ८ महिने लागतील. तो कुठं सुरू करायचा, त्याची जागाही पाहून ठेवलीय; नव्हे, त्या जमीनमालकाला खरेदीपोटी थोडा इसारही देऊन आलोय. १/२ विश्वासातील जोडपीही बघून ठेवली आहेत. आता फक्त तुमची संमती पाहिजे."

मी म्हणालो, "कर सुरुवात. आता एवढे कष्ट घेतलेत तर मी कसा नाही म्हणेन? बँकेच्या कर्जाची सोय पाहिली आहेस का?"

तो थोडा हसला. म्हणाला, "बाबा, कर्ज काढून कुठल्याही धंद्याची सुरुवात करता येत नाही आणि बँकही तसं कर्ज देत नाही. आपण काहीतरी बँकेला दाखवावं लागतं. धंदा जरा व्यवस्थित चालू लागला की, तो वाढवण्यासाठी बँकेचं कर्ज उपयोगी पडतं. आणि लगेच मिळतंही. कारण बँकेला प्रोजेक्ट फायद्यात चाललेला समोर दिसत असतो."

"मग, तुझं काय म्हणणं आहे?"

"बाबा, तुम्हाला थोडं अवघड वाटेल; पण हा शेतीचा नाद आपण सोडून देऊ या. त्यातल्या त्यात, केळीच्या शेतीचं काही खरं नाही. मागच्या दोन वर्षांत असं किती उत्पन्न मिळालं आपल्याला? बारा महिने तरी लागतात केळी उतरवायला. त्या काळात पाणी, औषधं, खतं आणि मशागत याचा किती व्याप होतो? शिवाय बाजारात भाव काय पडेल ते निराळंच. मला काही केळीची शेती योग्य वाटत नाही. आपण हे बदलू या."

"मग काय सुचवायचंय तुला?"

"मी म्हणतो की, विकू या ही केळीची १० एकरांची बाग. उरलेली दोन-चार एकर शेती घरच्या खाण्यापुरतीच

राहील. म्हणजे धंद्यात बदल होईल. दररोज ताजा पैसा हातात येईल. तुमच्या आणि माझ्या ज्ञानाचाही धंद्यात उपयोग होईल. अशी कोणती गोष्ट या धंद्यातली, जी आपल्याला माहीत नाही? कोंबडीचं खाद्य, औषधं, लसीकरण सगळं आपल्याला माहीत आहे. उरलं काय तर शेड उभारायचं काम. ते काय थोडा सल्ला घेऊन करून टाकू चार महिन्यांत. दोन जोडपी तर मी बघून ठेवलीत; ती तयार आहेत तिथे राहायला."

मी बुचकळ्यात पडलो. काय ह्या पोराचं धाडस! जे आहे ते बंद करायचं म्हणतोय. आणि ज्यातल्या काहीच गोष्टी माहीत नाही त्यात उडी घेण्याचा बेत करतोय. माझी पत्नी हे नीट लक्ष देऊन ऐकत होती. तिलाही माझ्याप्रमाणे हा वेडेपणा वाटत होता. पण मुलगा सारखा पटवून देत गेला. तसं तिचंही मत बदलत गेलं.

"अहो, जाऊ द्या. पोरगं म्हणतंय तर करू द्या त्याला हवं ते. एकटं तर आहे. आणि कोण जाणे, जमलाच त्याला तो धंदा, तर आपल्याला तरी जरा सुखाचे दिवस येतील. केळीच्या बागेसाठी किती खपताय तुम्ही! किती असतो केळीला भाव?"

त्या चार दिवसांच्या सुट्टीत पोरानं आम्हाला भुरळ घातली. केळीची बाग विकण्याचा निर्णय घ्यायला लावूनच तो नाशिकला परतला.

मी जमीन विकायला काढली म्हटल्यावर शेजारच्या शेतक-यानंच ती विकत घ्यायची ऑफर दिली. यथावकाश खरेदीखत झालं. खरेदीखताच्या दिवशी मुलाला बोलावून त्याचीही खरेदीखतावर सही घेतली. आलो आम्ही नवरा-बायको नाशिकला.

आता आलंच ते गाव जिथे शेड उभारली ते! तिथली कथा तिथं सांगतो. बघताबघता समोर दोन मोठ्या शेड्स दिसल्या. 'ह्या त्या शेड्स' म्हणून आम्ही शेड्सजवळ उतरलो. मुलगा आलेला नव्हता. वास्तविक रविवार म्हणून तो इथं असायला हवा होता. पण तो आला नव्हता. गडीमाणसांना दिलेल्या खोल्यांतून बायका स्वयंपाक करीत होत्या. पण त्यांचे पुरुष तिथे दिसत नव्हते. डॉक्टरांनी विचारल्यावर बायकांनी सांगितलं की, माणसं शेजारच्या गावात गेलीत काही पोल्ट्रीचं सामान आणायला. शेडमधल्या कोंबड्या जोरजोरानं आवाज करत इकडून तिकडे फिरत होत्या. त्यांच्या पुढच्या खाण्याच्या बशांत काहीच वाढलेलं नव्हतं. पाण्याची सोय केलेली होती खरी; पण प्लॅस्टिकच्या भांड्यातून पाणीही नव्हतं. ही प्रत्येक गोष्ट डॉक्टरांनी माझ्या नजरेला आणून दिली.

"बघितलं ही आमच्या मुलाची पोल्ट्री - पोल्ट्री फार्म! आता आणखी एक सांगतो. आज अचानक आलो म्हणून अशी अवस्था दिसते, पण रोज अगदी वेळच्या वेळेला पशुखाद्य, पाणी, औषधं दिली जातात, असं गडीमाणसं आल्यावर म्हणतील आणि आणखी एक, ती गडीमाणसं हेही सांगतील की, काही कोंबड्या आजारानं दगावल्या. त्या दगावलेल्या असतात का? नाही. त्या गावात नेऊन विकलेल्या असतात. अहो, अंडीसुद्धा दररोज किती असायला पाहिजेत, त्याचा अंदाज असतो. पण त्याच्या निम्म्यानं हिशेबात दाखवतात. एकदा तर ती शेजारच्या खड्डयात निगुतीनं पेरलेली मी पाहिलीत.

"मी हे सगळं मुलाला विचारलं तो म्हणतो, 'चालायचंच. पहिल्यापहिल्यांदा असंच व्हायचंच. आपण आता एक सुपरव्हायजर ठेवू.' म्हणजे काय तर तो सुपरव्हायजर आणि गडीमाणसं मिळून आणखी अंडी कमी करतील; आणखी कोंबड्या बाजारात विकतील. हा नाशिकमध्ये आणि कोंबड्या इथे, हे असं किती दिवस चालायचंय राम जाणे! आता वाटतंय, उगीच केळीची बाग विकली. मी निदान दररोज चार-पाच तास तिची निग्राणी ठेवत होतो. कमी भावानं का होईना, पण निश्चित उत्पन्न घेत होतो. या पोराचा धंदा काही खरा नाही. इतकी अनावस्था आणि इतक्या चो-या? छे! बघवत नाही. शिवाय बँकेच्या कर्जाच्या हप्त्याचा मीटर काही बंद नाही. त्याबद्दल मुलगा काही बोलत नाही. पण मला त्याची पूर्ण माहिती आहे. हा ह्या धंद्यात बुडणार; हे अगदी सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ आहे. पण सांगता कुणाला? आपलेच दात आणि आपलेच ओठ."

"तुम्ही म्हणताय ते अगदी खरं आहे, डॉक्टर. पण तुम्ही हे आत्ताच सगळं मोडून टाकायला का नाही सांगत मुलाला? निदान यापुढचा अनर्थ तरी टळेल

ना?" – मी.

"अहो, ते शक्य नाही. तो फार तापट आहे. विषय काढला तर भडकेल. शिवाय त्याच्या आईला खूप आशा आहे. त्याच्या धंद्याबद्दल ती म्हणते, 'उघडतील त्याचे डोळे हळूहळू.' मी नेहमी तिला म्हणतो, 'अगं, माझे डोळे मिटायची वेळ आलीय; त्याचे कसले उघडतायत?" आमच्या दोघांचं हे चाललेयं असत घरातलं भांडण. त्याला समजावून सांगणं मोठं जिकिरीचं झालंय.

तो पण हुशार. त्याला माहीत आहे की, मी हे सगळं पाहतोय. मग तो काय करतो? संध्याकाळी एक व्हिस्कीची बाटली आणून ठेवतो माझ्यापुढं. अगदी चकण्यासकट, मीही मग सगळे विचार बाजूला ठेवून घेतो ती. अगदी सगळी संपवतो. थोडं खातो आणि झोपतो.

आता माझ्याबरोबरच हा धंदा झोपणार हे निश्चित. पण करता काय? हिच्यात जीव अडकतो म्हणून आत्महत्या करायची नाही एवढंच.

डॉक्टरांपासून जरा दूर जाऊन मी सगळ्या गोष्टींचा आढावा घेतला. शेड्समध्ये अगदी अनागोंदीचा कारभार होता. कुठलीच गोष्ट पद्धतशीर होत नव्हती. माझं डोकं सुन्न झालं. मी काही डॉक्टरांना सांगावं आणि त्यांनी ऐकावं याच्या पलीकडचंच सगळं प्रकरण होतं. जरा वेळानं काही न बोलता आम्ही दोघंही गाडीत बसलो आणि नाशिकचा रस्ता धरला.

(२)

सगळी संसाधनं उपलब्ध असूनही एखाद्या शेतक-याच्या मागं काय शुक्लकाष्ट लागेल, त्याचा नेम नाही.

माझ्या हाताखाली एक शिपाई होता. 'काही बोलायचंय', अशी त्याची भुणभुण माझ्यामागे असे. पण तो बोलायला आला की, काहीतरी गडबडीचं काम निघे, फोन येई किंवा कुणीतरी भेटायला येई आणि त्याच ते 'बोलायचं' तसंच राहून जाई. पण एकदा त्याला ते जमलं. माझी १० मिनिटं त्याला मिळाली.

तेव्हा तो म्हणाला, "इथून १०/१२ किलोमीटर अंतरावर माझ्या आतेभावाची शेती आहे. तुम्ही एकदा ती पाहावी आणि काही मार्ग निघतोय का ते सुचवावं, असं मला वाटतं."

"शेती किती आहे? आणि घरी माणसं किती आहेत?"

"शेती १० एकर. पाण्याची सोय म्हणजे अगदी जवळून नदी वाहते आहे आणि पाण्याची विहीरही आहेच. पण काहीतरी बिघडलंय. भावाची अगदी वाईट स्थिती आहे."

"म्हणजे मग तो आळशी आहे, हे अगदी डोळे झाकून सांगण्यासारखं आहे."

"नाही, तसं नाही. कधीकधी त्याने अतिशय सुंदर पिकं तेथे काढलेली मी पाहिली आहेत. माझा आतेभाऊ लहान आहे. म्हणजे १९-२० वर्षांचा आहे. तो किंवा त्याचे वडीलही व्यसनी नाहीत. त्याला ३ बहिणी आहेत. एकीचं लग्न झालंय आणि दोघी लग्नाच्या आहेत. त्याही शेतीत मदत करतात. पण काहीतरी बिघडलंय बघा. एकदा जाऊ या शेतावर. फार उपकार होतील."

"ठीक आहे. काढू वेळ आणि जाऊन येऊ."

काही दिवस गेले आणि आम्ही त्या शेतावर गेलो. आमच्या शिपायानं सांगितलं होतं त्याप्रमाणे शेती होती. पण त्यानं न सांगितलेलं एक गंभीर प्रकरण तिथे होतं. शेताच्या मधोमध एक १० गुंठ्यांचं पॉलीहाउस होतं. बांधलेलं तर पक्कं होतं, कुठं काही चूक दिसत नव्हती. पण आत डोकावल्यावर तिथे काहीच उत्पन्न दिसले नाही. ड्रिप इरिगेशनचे पाईप तिथेच पडलेले होते. शिवाय सरी, ओळंबे आणि इतर अवजारे अस्ताव्यस्त पसरलेली होती.

शिपायाला विचारलं, "इथं पिकं काय घेत होता? ढोबळी मिरची की फुलं?"

एवढ्यात तो मुलगा, त्याचे वडील आणि आई तिथं पोचले. मग मुलानं सगळी हकीकत सांगितली. "पहिल्यांदा इथं मी कोबी, फ्लॉवर, वांगी, भेंडी वगैरे पिके घेत होतो. मला वाटलं, काहीतरी निराळं करावं. म्हणून मी हे पॉलीहाउस प्रकरण तयार करून बँकेत दाखल केलं. बँकेन ते लगेच मंजुर केलं. जमीन १० एकर, पाण्याची सोय आणि जमिनीवर कोणतंच कर्ज नाही, त्यामुळे त्यांना कुठलीच अडचण आली नाही. मी आईचे दागिने विकून अडीच लाख रुपये उभे केले

आणि बँकेने साडेसात लाख रुपये कर्ज दिलं.

"गुलाबाची रोपं चांगल्या नर्सरीतनं आणली आणि एका शेतीअधिका-याची मदत घेऊन खतं, औषधं आणि ड्रिपची सोय केली. रोपं वरती येईपर्यंत बरं होतं. पण काय झालं एकाएकी की, कळी यायच्या वेळी रोपांवर रोग पडला. सगळी रोपं खुरपटली आणि पार सुकून गेली. पण तोवर एक वर्ष गेलं आणि कर्जाचे हप्ते सुरू झाले. पहिल्या वर्षाच्या व्याजाची डिमांड पाहूनच हबकून गेलो. आता हे कसं फेडायचं या काळजीत असतानाच एका मित्रानं थोडी मदत करायची इच्छा दाखवली.

"हा मित्र शेती आणि ट्रॅक्टरच्या वाहतुकीच्या भाड्याचा धंदा करत होता. पण त्याला एका कंपनीत नोकरी लागली आणि पगार बरा मिळतोय म्हणून त्याने शेती आणि ट्रॅक्टरवाहतूक बंद करायचं ठरवलं. मी मग इकडूनतिकडून पैसे गोळा करून त्याचा जुना ट्रॅक्टर विकत घेतला. वाटत होतं की, ट्रॅक्टरवाहतुकीच्या पैशातून बँकेचे हप्ते भरायला मदत होईल.

"पण आता वाहतुकीची मागणीही कमी झाली होती. रोज काम मिळतंय असं काही होईना त्यातच ट्रॅक्टरच्या दुरुस्तीचं कामं निघतं. म्हणजे ट्रॅक्टरमधून काही पैसे मिळायचे ते राहीलेच, पण उलट त्याच्यावरचा खर्चच वाढत गेला. पार जिकिरीला आलो. हा मामेभाऊ भेटायला यायचा. त्याला हे सगळं सांगितलं. त्यानंच तुम्हाला आणलेलं दिसतंय. खरं ना?"

"ते खरंच आहे, पण हे सगळं करताना आई-वडिलांचा सल्ला घेतलास का? जुन्या माणसांना अनुभव असतो व्यवहाराचा. त्यांनी नाही का तुला काही सांगितलं?" – मी.

"वडील म्हणायचे मधूनमधून, हे असलं न पेलणारं प्रकरण नको घेऊस अंगावर. म्हणून, पण काय करणार? आधुनिक शेतीची भुरळ पडली आणि हे असं होत गेलं. आता यातून बाहेर कसं पडायचं?"

"तुझ शिक्षण किती झालंय?"

"आई खूप कष्ट करते. बहिणीपण राबतात. तेव्हा आपणच आता शिक्षण बंद करून परिस्थिती सावरावी यासाठी उतरलो या भानगडीत पण हे गाणं फारच लांबलंय आणि मी अगदी निराश झालोय."

"हे पहा, निराश होऊ नकोस. निघेल काहीतरी मार्ग. पण एक लक्षात ठेव, प्रामाणिकपणा सोडू नकोस; लांड्यालबाड्या करू नकोस, म्हणजे झालं. बघतो काही तोडगा निघतोय का. शांत रहा आणि रोजच्या कामात गुंतून राहा."

"होय साहेब. कसले वाईटसाईट विचार मनात येत नाहीत. पण या कर्जातनं मोकळा कसा होईन, हाच ध्यास लागला आहे. आपल्याला काही करता येईल का?"

पोराचे विचार चांगले, नियत चांगली, कष्ट करायची तयारी चांगली; तरीही हा काय भोग ह्याच्या पाठीमागे लागला, असा विचार करत मी ते रान सोडलं. मी काहीतरी नक्की करीन, एवढं मात्र त्या दोघांना सांगितलं. योगायोगानं दुस-याच आठवड्यात माझ्या एका नातेवाइकाची ओळख सांगत एक शुभ्र वस्त्रधारी व्यक्ती माझ्याकडे आली. बोलताना ध्यानात आलं की, या गृहस्थालाही शेतीची खूप आवड आहे. नर्सरी, फुलझाडं, फळझाडं यांची चांगली माहिती आहे. पण सध्या कंत्राटदार म्हणून रस्त्याची आणि इमारतीची बांधकामं ते हाती घेतात. माझ्या मनात विचार आला की, या बाबांचा उपयोग त्या पोराला झाला तर चांगलं होईल. म्हणून त्यांना म्हणालो, "एखादंदिवशी वेळ काढून याल का? तिथ एका शेतावर जायचंय. तिथं गेल्यावर मी सांगीन माझ्या मनात काय आहे ते."

"असं? मग उद्याचं १० वाजता येतो. आता वेळ नाही; एका ऑफिसात बिलाच्या वसुलीसाठी जायचंय."

दुस-या दिवशी माणूस वेळेवर हजर. त्यांच्याच गाडीतून शेतावर पोचल्यावर त्यांनी शोधक दृष्टीने सगळं रानं पाहिलयं. पाण्याची सोय, विहिरीची खोली, जमिनीचा पोत सगळं अगदी दर्दी शिपायासारखं तपासलं.

शेतातल्या घरात आम्ही थोडे विसावलो. मुलाच्या आईनं फराळाचं दिलं. ते घेऊन आम्ही न बोलता तिथून बाहेर पडून रस्त्यावर आलो.

"साहेब, या शेतक-याला आणि त्याच्या मुलाला तुम्ही किती दिवसांपासून ओळखता?"

"अहो, मागच्या आठवड्यात तर येऊन गेलो. हा शिपाई बरोबर आहे त्याचा तो आतेभाऊ." – मी.




अनुक्रमणिका



"असं होय! अर्थात ते काही फारसं महत्त्वाचं नाही. ही फॅमिली साधीभोळी आहे आणि मुलगा तर अगदीच अननुभवी. जर निर्णय घ्यायचा तर यांतला कोण निर्णय घेणार?

"माझ्या डोक्यात एक कल्पना आहे. पाण्याचा स्रोत चांगला आहे. या दहा एकराच्या मळ्यात चहूबाजूंनी नारळाची रोपं लावायची आणि इथे एक नर्सरी सुरू करायची. माझा एक मित्र नर्सरी चालवतो. त्याला ही आपण आयडिया देऊ शकतो. पण व्यवहाराचं कुणाबरोबर कसं ठरवायचं, ते पहा. तुम्ही म्हणत असाल तर घेतो या छोट्याशा धंद्यात उडी. या शेतक-याचंही भलं होईल आणि माझाही खुळा नाद पुरा होईल."

"अहो, मग आत्ताच परत फिरू आणि बोलू त्या बाप-लेकांशी. तुम्हालाही अंदाज येईल त्यांच्या वागण्या-बोलण्याचा. तुम्हीच तुमच्या मनातलं त्यांना सांगा. पटलं तर ठीक. इथेच तुकडा पडलेला बरा." – मी.

"असं म्हणता? चला फिरू परत."

आम्ही परत गेलो. त्यांच्या घरात बैठक बसली. आमचे मित्र म्हणाले, "मला वाटतं इथे एक नर्सरी करावी. त्या अगोदर सगळ्या रानाच्या भोवती नारळाची सुंदर झाडं सारख्या अंतरावर लावावीत. म्हणजे जागेला जरा गेटअप येईल; आणि कुणी लांबून बघितलं तरी त्याला आल्हाददायक वाटेल. नर्सरी संभाळणारा माझा मित्र आहे, त्याला आपण इथं बोलवू. त्याच्या म्हणण्याप्रमाणं धंदा सुरू करू. आता व्यवहाराचं बोलायचयं म्हटलं तर तुमच्या काय अपेक्षा आहेत, ते सांगा."

वडिलांना आणि मुलाला काय बोलावं, ते कळेना. ते गपगुमान बसले. आमच्याकडे बघतच राहिले.

मीच शेवटी विचारलं, "म्हणजे काही एक-दोन एकर जमीन भाड्यानं घेऊन तुम्ही हे करणार का? भाडं वर्षाचं ठरवतात, हे मला माहीत आहे. तुमचा नक्की प्लॅन काय?" – मी.

"अगदी बरोबर. माझ्या डोक्यात असं की, यांची १० एकर जागा आहे. त्यांनी मला ५ एकर जागा दर वर्षाच्या भाड्यानं द्यावी. मी ॲडव्हान्स म्हणूनही त्यांना ५ एकरांचे भाड्याचे पैसे देत जाईन. भोवतालची नारळाची झाडं लावणं हा माझा छंद. त्याचा खर्च माझा मी करत जाईन."

"बरं, मग भाड्यात पाच एकर द्यायची तर किती भाडं देणार? म्हणजे दर एकरी दर वर्षी?" – मी.

"आत्ता बाजारात हा भाव दर एकरी दर वर्षी १० हजार रुपये आहे. पण हा धंदा थोडा नाजूक आहे, चढ-उताराचा आहे. कमीतकमी २० वर्षांसाठी ही पाच एकर जमीन माझ्याकडे राहिली पाहिजे. अर्थात त्यांच्या राहिलेल्या ५ एकरांसाठी खंत, पाण्याचा खर्च हे सगळं मी हौसेन करत जाईन. लागेल ती मदतही देईन. खरं सांगू का, हे माझं खूप वर्ष मनात वागवलेलं एक स्वप्न आहे. माझा यात फायदा किती होईल, तोटा किती होईल, हे मी पाहणार नाही. छंद पुरवला जाईल याची खात्री वाटली म्हणून मनात होतं ते झटक्यात बोलून दाखवलं."

(३)

गडी भलताच उत्साही निघाला. कर्तबगारही वाटला, पण मुद्दा निराळाच होता. हे सगळं त्या बाप-लेकांना कसं पटवावं? ती दोघं माझ्याकडेच पाहत होती. एकूण इतक्या तडकाफडकीचं बोलणं व्यवहाराच्या मार्गावर कसं आणावं, ते कळेना. पण हे झालं तर दोघांचाही फायदा आहे, हे फक्त कळत होतं.

"मंडळी, बघा विचार करून. तुम्ही हवंतर काही दिवस घेऊन विचार करून निर्णय करा. कारण, यात तुम्हा दोघांचा काय फायदा-तोटा आहे हे तुम्हीच ठरवायचं आहे." – मी.

वडील पटकन म्हणाले, "आता तुम्ही काय वेडवाकडं का सांगणार? तुम्ही म्हणाल तसं करू."

बहुधा हे असंच होत. ज्याचं भलं करायला जावं तो आपल्याच गळ्यात पडतो, हा अनुभव काही मला नवा नव्हता.

"इतका मोठेपणा मला देऊ नका. तुम्ही हवंतर पुन्हा एकत्र बसा आणि परस्पर निर्णय घ्या. पण यात काही ठोस निर्णय दोघांच्या संमतीने निघाला तर दोघांचाही फायदा दिसतोय. बघा तुमचं तुम्ही." – मी

यातून पुन्हा सुटण्याचा प्रयत्न केला.

"आता हे असं इथंच आम्हाला सोडू नका. काय

व्हायचंय ते होईल, पण हे ठरवल्याशिवाय जाऊ नगा." – वडील.

"ठरवायचं काय त्यात? हा व्यवहार लेखीटाकी नको."

"अगदी विश्वासानं दोघंही राहणार असाल तर हे म्हणातात तसं करा. मात्र ह्यानंतर माझ्यापुढे भुणभुण नको" – मी

"कशाची भुणभूण? करू आम्ही ॲडजेस्ट!" – वडील.

झालं सगळं झटपट ठरलं. दुपारी त्या गृहस्थानं त्या बँकेतून ५० हजार रुपये आणून त्या कुटुंबाच्या पुढं ठेवलेसुद्धा!

एका कुटुंबाला आपण काही मार्ग दाखवू शकतो. याचाच मला खूप आनंद झाला आम्ही परत आलो. आता ह्या दोन्ही बाजूंचे व्यवहार सुरू झाले. नर्सरीच्या माणसांशी बोलणं सुरू होतं, पण त्याच्या ब-याच अडचणी होत्या. इथं येऊनं राहणं त्याला प्रापंचिक अडचणींमुळे शक्य नव्हतं आणि त्यामुळे तो प्रकार थोडा मागे पडला.

पण न डगमगता या गृहस्थाने जमीन नांगरून कुळवटीनं तयार केली आणि वांगी, भेंडी लावायला सुरुवात केली. सगळं व्यवस्थित चाललंय हे दाखवायला ते मला तिथ घेऊनही गेले.

हळूहळू जम बसतोय म्हटल्यावर भाड्यानं घेतलेल्या ५ एकरांत या गृहस्थानं छोटंसं पण पक्कं घर उभं केलं. गोठा बांधला, गाई-म्हशी घेतल्या आणि दुधाचा धंदा सुरू केला. अगदी निर्भेळ दुध आसपास पाठवून मार्केट काबीज केलं. गाई म्हशींचं शेण, मूत सगळ्या १० एकरांना पुरू लागलं. त्या बाप-लेकांचीही शेती थोडीफार बहरू लागली. दोघांचा फायदा दोघांच्याही दृष्टिपथात येऊ लागला.

पोरगा महाउद्योगी. आता वडील शेतीत लक्ष घालतायंत. त्यानं ५ गुंठ्याची एक जागा भाड्यानं घेतली आणि लोखंडी सामानविक्रीचं दुकान काढलं. म्हणजे सळ्या, अँगल्स, खिळे, मोळे असं सगळं त्यात ठेवलं. तो एक-दोन वर्षांचा अनुभव आल्यावर त्यांन ट्रक, टेम्पो या गाड्यांवर बॉड्या बांधण्याचा उद्योग सुरू केला. एक टीमच तयार केली. वेळेवर डिलिव्हरी आणि मार्केट दरापेक्षा कमी दराची आकारणी यांच्यामुळे सारखी मागणी येत राहिली. धंदा वाढत गेल्यावर ट्रक, टेम्पो शेतावर जाऊ शकेल इतक्या रुंदीची जागा त्यानं शेजारच्या शेतक-याकडनं विकत घेतली. नंतर एक-दोन वर्षांत आपल्या दोन्ही बहिणींची लग्नं उरकली.

पण एके दिवशी थोडा गंभीर प्रकार घडला. काही कारणावरून भाडेकरू गृहस्थाच्या मुलाचं आणि शेतक-याच्या मुलाचं भांडण झालं. ते चिघळतंय की काय, याची मला काळजी. दोघंही तरुण, असं व्हायचंच थोडं असं मला आणि त्या भाडेकरू गृहस्थांना वाटलं. ८-१५ दिवस प्रकरण तापलेलं राहिलं. पण शेवटी ते निवळलं.

शेतक-यापेक्षा त्याचा मुलगा हुशार आणि कर्तबगार निघाला. त्याला आसपासची स्थळं येऊ लागली. त्या मुलापेक्षा २ इयत्ता जास्त शिकलेल्या मुलीचं स्थळ आलं. मुलगी छान आणि हसतमुख होती. लग्न ठरलं. मुलीकडच्या मंडळींनी थाटात लग्न लावून दिलं. मला आणि माझ्या बायकोला तर त्यानं गाडी पाठवून लग्नाला ओढूनच नेलं.

आता आणखी एक व्यवसाय त्यानं सुरू केलाय. विहिरीच्या पाण्याचा उपसा करून बिसलेरीसारख्या बाटल्या भरून तो विकतो. त्यासाठी लागणा-या सगळ्या परवानग्या त्यानं मिळवल्यात. वडील शेती पाहतात. आईतर अहर्निश कामाच्या धबाडग्यात असते. कधी गेलंतरी निदान पटकन पिठलं-भाकरीचं जेवण घातल्याशिवाय परत पाठवत नाही. ✷✷✷

अनुक्रमणिका

# न्यायालयातील खटल्यांची गर्दी

विश्वास दांडेकर

न्यायव्यवस्थेशी पहिला संवाद झाला महाविद्यालयात असताना. मित्राच्या खोलीवर रात्री अभ्यास करताना चहा खुणावू लागला. त्या पन्नाशीच्या दशकात पहाटे २-२।। ला चहा मिळण्याची जागा एकच – रेल्वे स्टेशन. कारण त्या वेळी दोन दिशांनी दोन गाड्या येत. क्रॉसिंग होत असे. दोन सायकली, त्यांवर चारजण, अर्थात 'डबलसीट'.

रिक्षा, स्कुटर यांचा प्रवेश रस्त्यावर अजून झाला नव्हता. भाड्याचे वाहन म्हणजे टांगा. ते रात्री क्वचितच असत. गावात मोटारी थोड्याच आणि त्याही श्रीमंतांकडे त्यामुळे पहाटे रस्ते निर्मनुष्य असत. चहा घेऊन परतत होतो, तो एका चौकात शिट्टी वाजली आणि 'रुको' असा करडा शब्द ऐकू आला. पाठोपाठ हवालदार अवतरला.

सायकलींना दिवा किंवा घंटा असलीच पाहिजे, असा नियम नव्हता; पण डबलसीटला बंदी होती. "डबल बैठते हो; पढे लिखे हो; चलो थाने पे!" काही तडजोड करावी असे ते गणवेशातील महाशय सुचवत होते. 'सवाल तो चव्वन्नी-अठ्ठन्नी का था.' मात्र काय करणार? आम्हा चौघांकडे मिळून एकही पैसा नव्हता. जे पैसे होते ते चहात खर्च झाले होते. परीक्षा, अभ्यास ह्या सबबी आणि विनवण्या सगळ्या व्यर्थ गेल्या. पोलीस ठाण्यावर दोन्ही सायकली ठेवून घेतल्या आणि 'चालान' दिले - 'सकाळी ठीक १०.३० वाजता अमक्या कोर्टात या.' काय करणार? दोन-तीन किलोमीटरची तंगडतोड नशिबी आली.

११ वाजता मॅजिस्ट्रेटसमोर सुनावणी. रात्री सामसूम रस्त्यावर 'डबल' हा गुन्हा ऐकून त्यांना गंमत वाटली. जरा हसत त्यांनी विचारले "पहिली बार बैठे थे ना?" तारुण्य, अगाऊपणा, अविवेक यांतल काही म्हणा, पण ह्या प्रश्नातली गर्भित सूचना आमच्या ध्यानी आली नाही. आम्ही उत्तर दिले, "बैठते बहुत बार है; पकडे गये पहिली बार" न्यायाधीश काही बोलण्याआधी कोर्टात हास्यकल्लोळ झाला आणि त्यात जज्जसाहेबही सामील झाले. 'पुन्हा असे करू नका, पळा आता', असे सांगत त्यांनी प्रकरण निकालात काढले.

अलीकडे सर्वोच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायमूर्तींनी न्यायालयात अडकलेल्या खटल्यांच्या ढिगा-याबाबत चिंता व खंत जाहीरपणे व्यक्त केली. देशाला आणखी ७० हजार न्यायाधीशांची गरज असल्याचेही सांगण्यात आले. मी या विषयाचा तज्ज्ञ नाही आणि मला त्याची फारशी माहितीही नाही. तथापि नोकरीच्या काळात भारताच्या निरनिराळ्या भागांतील न्यायालयांशी माझा थोडाफार संबंध आला. त्यातील काही प्रसंगांनी मला एका मुद्द्याचे महत्त्व शिकवले. तो मुद्दा जर तपशिलासह दिला, तर अडलेल्या खटल्यांचा प्रश्न जो निर्माण झाला आहे, त्याच्यावर थोडा प्रकाश पडेल.

वरच्या 'डबलसीट' प्रसंगात न्यायमूर्तींच्या उमद्या स्वभावाची झलक दिसते. त्याचप्रमाणे या बाबतीत पोलिसांनी तारतम्य सोडले, असेही त्यांना वाटले असावे.

माझ्या आयुष्याचा बहुतेक कार्यकाल आयुर्विमा महामंडळात गेला आणि निरनिराळ्या पाच-सहा राज्यांतून मी फिरलो. कायद्याच्या भाषेत हे महामंडळ 'स्टेट'च्या व्याख्येत मोडते. त्यामुळे ते खाजगी क्षेत्रात न येता त्याला सार्वजनिक क्षेत्राचे कायदे लागू होतात. आयुर्विमा धंद्याच्या जोडीला महामंडळ 'जनरल' विमा क्षेत्रातही काम करत असे. जनरल क्षेत्रातील मोठा धंदा म्युन्सिपालिट्या, जिल्हा परिषदा अशांकडून मिळेल त्या संस्था, वाहनांचे विमे महामंडळाकडूनच उतरवले जात.

अशाच एका पाण्याच्या टँकरचे 'थर्ड पार्टी' विमा-पत्र होते. एका खेचाखेच गर्दीच्या रस्त्यात तो टँकर व एक सायकलस्वार यांनी निसटती वास्तपुस्तके. त्यावर आधारून २० हजार रुपये नुकसानीचा दावा सायकलवाल्याने लावला. मालक म्हणून म्युनिसिपालिटी व विमा कंपनी म्हणून महामंडळ यांना वकिलाची नोटीस किंवा तक्रारपत्र असे काही मिळाले नव्हते. मात्र सायकल

अनुक्रमणिका

स्वाराने कोर्टात जी कागदपत्रे सादर केली होती, त्याच्या प्रती त्याने पाठवल्या होत्या.

सिव्हिल सर्जनचे सर्टिफिकेट होते. त्यात म्हटले होते की, डाव्या हाताच्या करंगळीला थोडेसे खरचटले आहे. रक्तस्राव किंवा फ्रॅक्चर नाही. बँडेज केले व धोका नको म्हणून, गरज वाटत नसतानाही धनुर्वात-प्रतिबंधक इंजेक्शन टोचले. खर्च शासनाचा. रोग्याला काहीही फी नाही. दुसरा कागद शहरातल्या सायकल विक्रेत्याचा होता. पुढच्या चाकाचे तीन स्पोक्स मोडले. ते बदलून चाक 'टू' करणे म्हणजे वेडेवाकडेपणा काढणे याचे रु. ३ मिळाले, असा तो कागद होता.

तेव्हा सायकलवाल्याचा एकूण खर्च झाला होता ३ रुपये. आपण सायकल उचलून नेली वगैरेचा खर्च धरता १०/१५ रुपयांपलीकडे प्रकरण जात नव्हते. मागणी मात्र २० हजार रुपयांची. पण काय करणार? आमच्या पॅनेलवरच्या वकिलाने सांगितले की, "मी पाहतो. मात्र पहिल्या दिवशी तुम्हाला कोर्टात हजर राहावे लागणार 'आम्ही दावा मान्य करतो; हे आमचे वकीलपत्र आणि यापुढे आमचे कामकाज हे वकील पाहतील', असे न्यायाधीशासमोर सांगावे लागते. १०-१५ मिनिटे लागतील."

समन्स असलेल्या तारखेला गेलो. कोर्ट सकाळी ११ वाजता सुरू होणार. तारखा देणे, वकीलपत्र दाखल करून घेणे अशा लहान-सहान बाबी मार्गी लागायला अर्धा-पाऊण तास लागेल आणि मग खटल्यांच्या सुनावण्या सुरू होतील, अशी अपेक्षा. पण न्यायाधीशमहाराजच हजर नाहीत. रजेवर? नाही, येतील. वाट पाहत बसणे आले. केव्हाही येतील आणि हजर नसल्यास नाराजी. त्यामुळे चहा, पाणी, निसर्गाची हाक वगैरे सगळे विसरून बसून राहणे. असे करत दुपारी जेवणाच्या सुट्टीची वेळ झाली. साधारण ३/३।। च्या सुमाराला न्यायाधीश आले. सोबत चार-पाच वकील आले. ते आपल्या आसनावर न जाता स्वतःच्या 'चेंबर'मध्ये गेले. तिथे भजी, फाफडा, चहा असा रसदपुरवठा सुरू झाला.

मी एका कागदावर नाव, संस्था लिहुन तो कागद चपराश्याला दिला आणि त्याच्याकरवी भेट मागितली. आत बोलावले. बसा म्हणणे वगैरे म्हणण्याची सभ्यता नाही. 'काय काम आहे?' भजे खाताखाता प्रश्न. मी थोडक्यात कामाचे स्वरूप सांगितले. न्यायाधीश चिडले, "एवढ्यासाठी तुम्ही भेट मागता? ही कामे ओपन कोर्टात होतात. तिकडे बसा." मी म्हणालो "ठीक आहे. सकाळी ११ पासून तिथंच आहे. तुम्हीही रजेवर नाहीत. किती वाजता ओपन कोर्ट हे सांगा." आता न्यायाधीशांच्या रागाचा स्फोट झाला. "मला उलट बोलता? तुमच्यावर न्यायालयाची बेअदबी केल्याबद्दल खटला भरीन. कंटेम्प्ट ऑफ कोर्ट!"

या त्यांच्या धमकीच्या वाक्यांनी माझा संयम संपला. मी त्यांना म्हटले की, 'असा खटला आपण भराच. पाहू या काय निष्पन्न होते ते. मात्र स्वतःच्या भविष्याची चिंता करा. अत्यंत अडचणींच्या जागी बदली होऊन सुरुवात होईल.' राज्याच्या उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश यांच्याशी माझी थोडी ओळख होती. अत्यंत कर्तव्यकठोर पण सज्जन अशी त्यांची ख्याती होती.

माझा जबाब ऐकून न्यायाधीशांची अवस्था 'सिदंती मम गात्राणि' अशी झाली. त्यांनी स्वतः उठून मला खुर्ची दिली. माझ्यासाठी चहा-भजी मागवली. आमच्या वकिलाला बोलावून औपचारिकता पार पाडत आम्हाला मोकळे केले. ताण निवळल्यावर मी त्यांना म्हटले, "त्या खटल्यात मुळात दम नाही हे त्या तक्रारदाराने दिलेल्या कागदपत्रांवरून स्पष्ट आहे. असे खटले दाखल होण्याच्या वेळीच निकालात काढले तर तुमच्यावर अनावश्यक कामाचा बोजा पडणार नाही." पुढे पहिल्याच सुनावणीच्या वेळी तक्रारदाराने खटला मागे घेतला.

यावरून एक गोष्ट स्पष्ट आहे की, शिस्तीचा अभाव, खटल्यासाठी नोटीस किंवा समन्स काढण्यापूर्वी कागदपत्र नीट न वाचणे ह्यामुळे अनेकदा नको ते खटले दाखल केले जातात. वकील हा 'ऑफिसर ऑफ द कोर्ट' मानला जातो. सायकलवाल्याचे वकीलपत्र ज्याने घेतले, त्याचाही दोष आहेच ना! त्याने आपल्या अशिलाला सांगायला पाहिजे होते की, असा खटला दाखल करणे म्हणजे कोर्टाचा वेळ वाया घालवण्यासारखे आहे.

(१)

यापुढे आलेला एक अनुभव विदारक आहे. मोठा आर्थिक कारभार असणा-या कुठल्याही संस्थेत ३१



अनुक्रमणिका





मार्चपूर्वी वर्षाचे हिशेब नीट जुळवण्याची लगबग सुरू असते. एका मर्यादित काळात ते काम संपवावे लागते. आमच्या आयुर्विमा महामंडळाचा ताळेबंद व त्याचा तपशील सांगणारी विवरणपत्रे तयार करणे हे एक अफाट काम असते. नंतर ह्या ताळेबंदाचे ऑडिट होते. ही ऑडिटेड अकाउंट्स संसदेत सादर केली जातात. थोडक्या काळात हे विस्तृत आणि किचकट काम पुरे करण्यासाठी त्या एक-दोन महिन्यांपुरती तात्पुरती माणसे कामावर नेमली जातात. अशी तात्कालिक भरती ४५ दिवसांपेक्षा जास्त काळासाठी करू नये, असा दंडक होता.

उगीच अडचणी येऊ नये म्हणून ही भरती रोजगार विनिमय केंद्रातून (एम्प्लॉयमेंट एक्स्चेंज) करून ही माणसे नोकरीस ठेवली जात. ही नोकरी तात्पुरती आहे व महामंडळातील कायम नोकरीशी तिचा काही संबंध नाही, हे सर्व उमेदवारांना कळवले जाई. अर्जदारांकडून एक फॉर्म भरून घेण्यात येई. त्या फॉर्मवर ठळक अक्षरांत ही केवळ तात्पुरती नोकरी आहे. असा मजकूर छापलेला असे. इतकेच नव्हे, तर निवडलेल्या उमेदवारांना जे नेमणूकपत्र दिले जाई, त्यात हा उल्लेख असायचाच आणि 'सर्व अटी मान्य' असे नेमणूकपत्राच्या कार्यालयीन प्रतीवर उमेदवाराकडून स्वाक्षरीसह लिहून घेतले जाई. नेमणुकीचा शेवटचा दिवस कोणता, याचाही उल्लेख नेमणूक पत्रात असे.

हे सर्व वर्षानुवर्षे सुरळीतपणे चालत होते. तथापि एके वर्षी एका तात्पुरत्या नोकरदाराने त्याचा कायमचा पत्ता असलेल्या तालुका कोर्टात असा अर्ज दाखल केला की, 'अमुकअमुक दिवशी मला नोकरीवरून विनाकारण काढण्यात येत आहे; तरी त्यावर स्टे मिळावा.' कोर्टाने 'स्टे' दिला आणि तो हुकूम महामंडळाच्या संबंधित शाखेवर बजावण्यात आला; सोबत कागद-पुराव्यांसह पुढच्या सुनावणीला हजर राहावे, अशी नोटिसही होती.

'स्टे' असताना काढू नये असा सल्ला मिळाल्यामूळे त्या व्यक्तीला कामावरून काढले नाही. दिलेल्या दिवशी सर्व प्रकरणाचा तपशील असलेले प्रतिज्ञापत्र तसेच संबंधित कागदपत्रांच्या प्रती न्यायालयात सादर करण्यात आल्या. खरेतर मुद्दा सूर्यप्रकाशासारखा स्वच्छ होता; पण न्यायालय तारखांवर तारखा देत गेले. अर्जदाराचा असा डाव होता की, कुठून तरी १८० दिवसांची नोकरी पुरी व्हावी. तसे काम झाल्यावर कोणत्यातरी कायद्याचा/न्यायालयीन निर्णयाचा आधार घेऊन नोकरी कायम करावी, अशी मागणी करावी.

आम्ही वकिलाला सुचविले की, उच्च न्यायालयात रीट अर्ज करून केसचा निकाल लवकर लावावा, असा आदेश खालच्या कोर्टासाठी मिळवावा. आमच्या वकीलाचे म्हणणे पडले की, असा रीट अर्ज करण्यासाठी संबंधित खटला 'जीवन-मरणांच्या निकराचा असावा लागतो. तेव्हा काही काळ वाट पाहू.'

पुढच्या तारखेला संबंधित न्यायाधीश रजेवर होते. म्हणून खटला दुस-या न्यायाधीशांसमोर आला. ह्या नवीन न्यायाधीशांनीही पुढची तारीख दिली होती. परंतु स्टे वाढवला नव्हता. आमच्या वकिलांनी लेखी सल्ला दिला की, पुन्हा अर्ज करून स्टे मिळेपर्यंत आता कुठलाही स्टे अस्तित्वात नाही. पुढची कार्यवाही त्याच दिवशी करण्यात आली. सोमवारी तो तरुण पुन्हा कार्यालयात आला, तेव्हा 'आता आपण आमच्या नोकरीत नाही तेव्हा बाहेर निघा नाहीतर 'ट्रेसपास'चा गुन्हा नोंदवू.' असे सांगण्यात आले. त्या तरुणाने बरीच बडबड केली. पण तो निघून गेला. पुढे काही घडले नाही. ३-४ दिवसांनंतर त्या तरुणाने वेतनाची थकबाकी गोळा केली व तो निघून गेला.

यावर काय टिपणी करणार? त्या तरुणाला अशी फिर्याद दाखल करण्याचा सल्ला त्याच्या वकिलाने कुठल्या आधारांवर दिला? खटला दाखल झाला तेव्हा न्यायाधीशांसमोर पूर्ण वस्तुस्थिती नव्हती. मात्र खटला करतेवेळी 'तुला कुठल्या कारणाने नोकरीतून काढत आहेत?' एवढा प्रश्नतरी स्टे द्यायच्या आधी न्यायाधीशांनी विचारायला नको होता का? पहिल्या सुनावणीच्या वेळी सर्व वस्तुस्थिती समोर असताना आणखी खटला लांबवण्यात काय 'अर्थ' होता?

### (२)

महामंडळात निरनिराळ्या खेळांच्या स्पर्धा होत. ॲथलेटिक्स, बॅडमिंटन, टेबलटेनिस, बुद्धिबळ वगैरे. हे सर्व खेळ व्यक्तिगत नैपुण्याचे; सांघिक नव्हेत. रचना अशी असे- शाखाकार्यालय स्वतःपुरत्या स्पर्धा घेई.






विभागीय कार्यालयाच्या अधिकारक्षेत्रात अशा १५-२० शाखा असत. विभागीय कार्यालयातले स्पर्धक आणि शाखा कार्यालयांतून विजयी होऊन आलेले खेळाडू यांचे सामने विभागीय कार्यालयाच्या गावी होत. नंतरची पायरी प्रादेशिक कार्यालये व शेवटी केंद्रस्तरीय सामने अशी असे. प्रवेशासाठी फक्त २५ पैसे एवढे शुल्क असे. शाखापातळीवरील विजेत्यांना विभागीय पातळीवर खेळण्यासाठी प्रवासखर्च व भत्ता देण्यात येई.

इथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, बॅडमिंटन हा खर्चिक खेळ आहे. तो खरेतर बंदिस्त हॉलमध्ये खेळला पाहिजे. पण असे हॉल तालुक्याच्या शहरातून कुठून असणार? बहुतेक ठिकाणी खेळ उघड्यावर खेळला जायचा.

आमच्या एका शाखेत एक चांगला बॅडमिंटन खेळाडू होता. त्या शाखेत स्पर्धा होत नसे; कारण त्याची एकमेव प्रवेशिका असे. मात्र एका नवीन भरतीत त्या शाखेत आलेल्या कर्मचा-याने २५ पैसे शुल्क भरून स्पर्धेत उतरण्याचे ठरवले. त्या गावी बॅडमिंटनचा हॉल नव्हता. नव्या कर्मचा-याने स्पर्धेच्या वेळी एक निवेदन शाखाधिका-यांना दिले. त्यात म्हटले होते की, बॅडमिंटन हा खेळ 'इन्डोअर' असल्यामूळे उघड्या कोर्टावर तो खेळवता येणार नाही. तरी स्पर्धा जिथे बंद हॉल उपलब्ध असेल अशा ठिकाणी घेण्यात यावी. त्यासाठी प्रवास खर्च, भत्ता इ. सर्व मिळावे. अर्थात ही मागणी नाकारण्यात आली. त्यामुळे त्या शाखेची स्पर्धेतील प्रवेशिका हुकली.

या नवीन कर्मचा-याने त्या गावच्या तालुका कोर्टात याचिका दाखल केली. 'मूलभूत अधिकारावर अतिक्रमण.' महामंडळाचा कर्मचारी म्हणून स्पर्धेत भाग घेण्याचा हक्क हा मूलभूत अधिकार आहे. यात बंदिस्त हॉलमध्ये खेळायला मिळणे याचाही समावेश होतो. तेव्हा न्यायालयाने हस्तक्षेप करावा.

माझी अशी समजूत की, घटनेने नोंदलेल्या मूलभूत अधिकारांच्या पायमल्लीचा न्यायनिवाडा करण्याचा अधिकार फक्त उच्च व सर्वोच्च न्यायालयांना आहे. तेव्हा या केसमध्ये न्यायालयाच्या अधिकारक्षेत्राचा मुद्दा प्राधान्याने उपस्थित करावा. आमच्या वकिलांचा सल्ला असा की, हा दावा प्रथमदर्शनी बालिश आहे, हे न्यायालयाच्या निदर्शनाला आणून द्यावे आणि प्रकरण फेटाळण्याची मागणी करावी.

न्यायाधीशांसमोर खटला आहे. फिर्यादी पक्षाने आपली बाजू मांडली. त्या वेळी न्यायाधीशांनी जे मिश्कील प्रश्न विचारले, त्यावरून त्यांचा कल जाणवत होता. फिर्यादी पक्षाचे म्हणणे संपल्यावर मी उभा राहिलो आणि म्हणालो की, 'मी वकील नाही त्यामुळे कोर्टापुढे म्हणणे मांडताना अनवधानाने काही वावगे बोलले जाईल. ते अनुचित वाटले तर मला लगेच थांबवा.' न्यायाधीशांनी हसतहसत हातानेच होकार दर्शवला.

मी म्हणालो की, 'या खेळाच्या स्पर्धा कर्मचा-यांच्या सुप्त गुणांना वाव मिळावा व त्यांच्यातील बंधुभाव वाढावा, यासाठी भरवल्या जातात. भारतात खूप ठिकाणी हॉल उपलब्ध नसतोच. तेव्हा खेळ या प्रकारामागचे तत्त्व खेळाडूंनी ध्यानी ठेवण्यावरच स्पर्धांचे यश-अपयश अवलंबून आहे. खटला दाखल करणा-या व्यक्तीस हा खेळ येत नाही. २५ पैशांत प्रवासखर्च मिळावा यासाठी किंवा विघ्नसंतोषी वृत्तीतून हा दावा दाखल केला आहे. मी येताना बॅडमिंटनची रॅकेट व फूल घेऊन आलो आहे. या दावाकर्त्याला 'फुलटॉस' करण्याच्या तीन संधी द्या. फूल व रॅकेट यांचा परस्पर स्पर्श एकदा जरी झाला, तरी त्याचे एकदा म्हणणे मान्य करू.'

न्यायाधीशांनी दावा दाखल करणा-याला 'हे मंजूर आहे का?' असे विचारले. त्याने मान खाली घालून नकार दिला. लगेच न्यायाधीशांनी त्याच्या वकिलांना 'खटला मागे घेता की कोर्टाचा वेळ वाया घालवण्यासाठी तुमच्या अशिलावर कार्यवाही करू?' असे विचारले, वकीलांनी आपल्या अशिलाला 'क्षमा मागून दावा मागे घे' असे सुनावले. दावा मागे घेण्यात आला. डिसमिस्ड अँड विथड्रॉन असा शेरा मिळाला.

(३)

अखेरचे प्रकरण एका गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्याचे. बनावट कागदपत्रे तयार करून विम्याची मुदतपूर्ती झाल्याने बोगस विमेदारांच्या नावे महामंडळाकडून मोठ्या रकमा मिळवण्याचा प्रयत्न केला गेला, त्यात पैसे दिले नाहीत.

एकाहून जास्त शाखांमध्ये अशा प्रकारचे प्रयत्न झाले असणे शक्य आहे, असे गृहीत धरून कार्यालयांतर्गत तपास झाला. पुरावे गोळा करण्यात येऊन चार कर्मचा-यांची चौकशी करण्यात आली व त्यांना काढून टाकण्यात आले. मोठा आर्थिक गैरव्यवहार असल्याने फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला. हस्ताक्षरतज्ज्ञ, कागदपत्रे, साक्षीदार, यांचा पुरेपूर बंदोबस्त असल्याने महामंडळ हे करू शकले. हे सर्व शोधण्यात माझा खूप सहभाग होता. पोलिसांना मोठा शोध घेण्याची जरुर पडली नाही. महामंडळानेच न्यायालयात गुन्हा सिद्ध होईल, इतका पुरावा तयार केला होता. ते सर्व कागदपत्र पोलिसांच्या ताब्यात होते.

इतके सगळे असतानाही कोर्टात खटला सुरू होण्यास ९ वर्षे लागली. मधल्या काळात माझ्या चार-पाच बदल्याही झाल्या. साक्षीदार म्हणून मला जे न्यायालयाचे बोलावणे आले, ते साक्षीच्या तारखेनंतर २ दिवसांनी मिळाले. व्यवस्था हे काय प्रकरण असते, हे पुन्हा कळण्याची सुरुवात झाली.

हे बोलावणे घेऊन एक पोलिस कॉन्स्टेबल बसने माझ्या गावी पाठवला गेला. हा प्रवास ६००-७०० किलोमीटरचा होता. कोर्टाने समन्सवर (बोलावण्यावर) तारीख टाकताना नीट विचार करून व पुरेसा वेळ देऊन साक्षीची तारीख ठरवली होती. मग हा उशीर का झाला? कारण असे होते की, पोलीस खात्यातील एका वरिष्ठ अधिका-याला आपल्या मुलीसाठी काही सामान पाठवायचे होते. तेव्हा इन्स्पेक्टरने समन्स पाठविण्याचा उपयोग ते सामान पाठवण्यासाठीही केला. परिणामी माझी साक्ष राहिली आणि नव्याने तारीख पडली.

पुढचे समन्स वेळेवर आले. आदल्या दिवशी पोचलो. सरकारी वकिलांना फोन केला की, मध्ये ९ वर्षे लोटली आहेत. तेव्हा खटल्यातील कुठल्या मुद्द्यावर माझी साक्ष घेतली जाणार आणि उलटतपासणीत काय प्रश्न येणार, याची चर्चा व्हायला हवी. त्यासाठीच मी एक दिवस आधी आलो आहे. तेव्हा तुम्हाला कुठे भेटू? त्यांनी कोरडेपणाने सांगितले, "तशी काही गरज नाही" आणि फोन खाली ठेवला.

प्रत्यक्ष कोर्टात त्या दिवशी खटला चाललाच नाही. चार आरोपींपैकी एकाचा वकील त्या दिवशी दुस-या कोर्टात होता. तेव्हा पुढची तारीख पडली. मुळात समन्समध्ये मला दोन दिवस साक्षीसाठी राहावे लागेल, असे कळवले होते. त्यामुळे परतीचे तिकीट त्याप्रमाणे काढले होते. दोन दिवस त्या गावात निरुद्योग घालवावे लागले.

त्यानंतरच्या तारखेला सरकारी वकील आजारी झाले म्हणून पुन्हा पुढची तारीख पडली.

नंतरच्या तारखेला मात्र खटला चालला. त्या प्रांतात न्यायाधीशांची भाषा हिंदी होती. मला हिंदी कळत असले तरी बोलण्याचा सराव नव्हता. मी हे न्यायाधीशांना सांगितले. न्यायाधीश म्हणाले, "तुम्ही उत्तर इंग्रजीत सांगा; मी ते तुम्हाला हिंदीत ऐकवतो. जर पटले तर तसे नोंदवू." त्या भाषांतरामूळे एकेका प्रश्नोत्तराला बराच वेळ लागत होता. स्टेनो मात्र कमालीच्या वेगाने व सुबकतेने टायपिंग करत असे.

माझी साक्ष आणि उलटतपासणी दिवसभर चालली. हा सर्व काळ मी उभा होतो. साक्षीदाराचा पिंजरा वगैरे काहीही नव्हते. खुर्ची मागवावी का, असाही विचार माझ्या मनात आला. पण तिथे रिकामी खुर्चीच नव्हती. पाणी वगैरे मागण्याचा प्रश्नच नव्हता. कोर्टाची खोली इतकी लहान होती. की त्या खोलीत केसशी संबंधित असणारे आम्ही दहा-बाराजण कसेबसे मावलो होतो. या परिस्थितीला न्यायालय जबाबदार नव्हते. कारण न्यायालयाला सुविधा उपलब्ध करून देणे ही शासनाची जबाबदारी होती. हायकोर्ट, सुप्रीमकोर्ट इथे बरी व्यवस्था असते. पण कनिष्ठ न्यायालयांची अगदीच परवड होते.

साक्ष सुरू झाली. मी सरकारी पक्षाचा साक्षीदार असल्याने सरकारी वकिलांचे प्रश्न आणि माझी उत्तरे असा क्रम चालू होता. एकाएकी त्यांनी हातातल्या कागदावर नजर टाकत मला एक प्रश्न विचारला. मी शांतपणे म्हटले की, असे काही घडलेलेच नाही. वकील भडकले आणि म्हणाले "लक्षात ठेवा. तुम्ही नीट उत्तर द्या; नाहीतर मी तुम्हाला उलटलेला साक्षीदार म्हणून जाहीर करीन. तुमच्या नोकरीवर आणि पुढील प्रगतीवर त्याचे भयंकर परिणाम होतील....." मी माझ्या उत्तरावर ठाम राहिलो आणि असेही म्हणालो की, "माझी नोकरी

आणि पुढची प्रगती यांची काळजी माझे वरिष्ठ करतील. तुम्ही मला धमकी देऊ नका." न्यायाधीश समजूतदार होते. जेवणासाठीची सुट्टी आधी अर्धातास घेत असल्याची घोषणा त्यांनी केली व कामकाज थांबवले.

बाहेर व्हरांड्यात मी सरकारी वकिलांना म्हटले की, "तुम्ही हे काय चालवलं आहे?" त्यावर त्यांनी मला एक कागद वाचायला दिला आणि म्हणाले, "हे तुमचे पोलिसांसमोर दिलेले स्टेटमेंट आहे. त्याला धरून माझा प्रश्न होता." कागद व त्यावरची तारीख पाहून मला हसू आले. एकतर त्यावर माझी स्वाक्षरी नव्हती. दुसरे म्हणजे कागदावर जी तारीख होती त्या सुमारास मी त्या ठिकाणाहून शेकडो किलोमीटर दूर होतो. तिसरे म्हणजे या बाबतीत कोणताही पोलीस अधिकारी मला कधी भेटला नव्हता. असे झाले असावे की, आमच्या खात्याच्या अंतर्गत जी काही कारवाई झाली होती, ते कागद पाहून कोणा पोलीस अधिका-यांने हे 'तथाकथित' स्टेटमेंट' तयार केले होते. मी सरकारी वकिलांना म्हणालो, "मी तुम्हाला म्हणत होतो आधी आपण भेटू या. तुम्ही नाही म्हणालात. आता त्या पोलीस इन्स्पेक्टरला इथे बोलवा. रुजुवात होऊन जाईल."

त्यावर सरकारी वकील ओशाळले. त्यानंतर त्यांनी जे सांगितले त्याचा सारांश असा.

१) वरील स्टेटमेंट तयार करणारा इन्स्पेक्टर काही महिन्यांपूर्वी एकाएकी वारला.

२) फौजदारी गुन्ह्याची जी सारणी आहे तीनुसार साक्षीदाराची स्वाक्षरी त्याच्या स्टेटमेंटवर घेतली जात नाही. किंबहुना, तशी स्वाक्षरी घ्यायचीच नसते.

३) जिथे खटला चालू होता त्या शहरातील ते मुख्य सरकारी वकील होते व त्यांच्या हाताखाली आणखी १२-१४ वकील होते. मात्र इतक्या सरकारी वकिलांकडे मिळून शासनाच्या वतीने लढवायच्या दाव्यांची संख्या जवळजवळ १५ हजार होती. त्यामुळे साक्षीदारांना भेटणे गरजेचे असले, तरी तेवढा वेळच नव्हता. कागदपत्रेही वाचायला वेळ मिळत नाही.

४) किचकट आर्थिक गुन्ह्याचा शोध घेणे व तसे खटले कोर्टात लढवणे यांचे प्रशिक्षण पोलिसांना दिले जात नाही तसे वकिलांनाही दिले जात नाही.

आता यावर काय बोलणार? असो. त्या दिवशी साक्ष पार पडली. कोर्टाचे काम सुरळीत संपले. आता पुराव्याचे सर्व कागद सील करून रेकॉर्ड नेण्याचे काम सुरू झाले. तेव्हा मी वकील व न्यायाधीश यांना म्हटले की, "मी काही अनधिकृत बोलू का?" न्यायाधीशांनी हसून संमती दिली.

मी म्हणालो, "या खटल्यात दोन-तीन तारखा पडल्याने मला खूप लांबून पुन्हापुन्हा यावे लागले." श्रम, पैसा आणि वेळ वाया गेला. पूर्वीही दोन-तीन वेळा हा अनुभव मला आला आहे. यावर एक उपाय आहे. याने प्रश्न पूर्णपणे सुटेल असे नाही. पण काही प्रमाणात सगळ्यांना सोयीचे होईल.

"उपाय सोपा आहे. या शहरात हायकोर्ट, कामगारकोर्ट, ग्राहककोर्ट, कौटुंबिक कोर्ट,.....अशी अनेक कोर्ट्स आहेत त्यामुळे वकिलांची संख्या पुष्कळ आहे. होते काय तर अनेक वकील ब-याच कोर्टात अमुक तारखेला सुनावणी होण्याला संमती देतात. अपेक्षा अशी असते की, सगळे खटले एका वेळेला येणार नाहीत. तेव्हा वकिलाचा बार कॉन्सिलने दिलेला क्रमांक आणि त्याच्या निरनिराळ्या कोर्टातील तारखा यांची माहिती संगणकावर ठेवावी. समजा X ह्या कोर्टात वकिलाने १६ जुलैला सांगितले की, २ ऑगस्ट ही तारीख सोयीची आहे; तर कोर्टाच्या कारकुनाने संगणकावरून माहिती काढून वकीलमहाशयांनी २ ऑगस्ट ही तारीख दुस-या कोणत्या कोर्टात सांगितली आहे, ते शोधून काढावे. म्हणजे संबंधित न्यायाधीश हस्तक्षेप करू शकतील."

हे आणखी तपशिलात सांगितल्यावर न्यायाधीश आणि वकील हसले. मी म्हटले "कुछ गलत बोला क्या?" न्यायाधीश म्हणाले, "जनाब, हमें यहाँ कॉम्प्युटर का ग्यान नहीं है; लेकिन वो सवाल नहीं। आप से प्रश्न है क्या आप कोर्ट में बलवा कराना चाहते हैं?" बलवा म्हणजे अराजक; क्रांती नव्हे. मला काही कळेना तेव्हा न्यायाधीशांनी खुलासा केला, "यहाँ बहुत सारे वकिलोंकी प्रक्टिस तारीख पे तारीख इस आधारपर चलती हे।"

(४)

तेव्हा जास्त न्यायालये गरजेची आहेतच; पण ते




एकमेव कारण नाही. यात संसद आणि शासन यांनाही बरेच काही करता येईल.

साधे उदाहरण चेक डिसऑनर होणे - म्हणजे न वटणे. जर तपशीलातील काही चुकीमुळे चेक वटला नाही, तर दोन्ही पक्ष आपसात दुरुस्ती करून प्रश्न संपवतात आणि प्रकरण कोर्टात येतच नाही. मात्र खात्यात रक्कम नसताना चेक देणे किंवा दिल्यावर 'स्टॉप पेमेंट' असे पत्र बँकेला देणे असे झाल्यास प्रकरण कोर्टात येते. बँकेचे तशा अर्थाचे पत्र असेल, तर केस दाखल करून घेतानाच निकाल यायला हवा. मात्र याबाबतच्या कायद्यातील तरतूदी किचकट, वेळकाढू व खर्चिक आहेत हे नीट केले तर काही लाख केसेस एका फटक्यात निकालात येतील आणि फसवाफसवी होणे थांबेल.

उदाहरणे आणखी आहेत; मात्र त्यामागचे तत्त्व लक्षात घेतले पाहिजे- ते म्हणजे इच्छाशक्ती.

न्यायालये, शासन, संसद यांनी जर अशी इच्छाशक्ती दाखवली, तर आज ज्या तीन कोटी केसेस न्यायालयात अडकून आहेत, त्यांतील ब-याच केसेस लवकरात लवकर निकालात निघू शकतील. ✷✷✷

---












# वैचारिक साहित्य 'संकल्पना'

म. ई. तंगावार

माणूस हा विचारशील प्राणी आहे. बुद्धी आणि भावना यांचा सुरेख संगम माणसाच्या व्यक्तिमत्त्वात झालेला आहे. विचारशील प्राणी म्हणून माणसाचे वेगळेपण आपण सांगत असलो, तरी सगळीच माणसे चांगले विचार करणारी असतात, असे नाही. परंतु प्रत्येक माणूस विचारी आहे हे वैज्ञानिक सत्य नाकारता येत नाही. विचारामुळेच माणसाने स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व सजीव सृष्टीत निर्माण केले आहे. इतर पशु-प्राणी विचार करीत असले, तरी त्यांना आपल्या अवस्थेत व स्वभावात बदल करता येत नाही. माणूस आपल्या अनुभवानुसार बौद्धिक दृष्ट्या परिपक्व होत जातो. या बौद्धिक परिपक्वतेतूनच नवनवीन विचारांची निर्मिती होते. त्यामुळेच तर माणूस हा परिवर्तनशील प्राणी म्हणून ओळखला जातो. प्रत्येक माणसाजवळ विचार असतोच; मग तो विचार चांगला असेल किंवा वाईट. त्यानुसार कृती घडत असते. विचाराचा प्रतिवाद हा विचारानेच करता येतो. अविचारी माणसाला मारल्यामुळे ती वृत्ती संपत नाही. दुष्ट प्रवृत्तीला मारणे गरजेचे आहे. हे काम विचारी माणूसच करू शकतो; कारण विचार हा परिवर्तनाचा आधार असतो.

जीवनात प्रत्येक प्रश्न विचाराच्या निकषावर तपासून पाहिला पाहिजे. स्वहिताप्रमाणेच समाजहित लक्षात घेऊन केलेल्या विचारामुळे भावनेला व कृतीला चालना मिळते. प्रेरणादायी विचार माणसाला कृतिप्रवण करतात. विचार एका अर्थाने स्वातंत्र्याचा आविष्कारच असतो. माणूस-देखील प्राणी आहे; पण तो प्राण्यापेक्षा अधिक काही-तरी आहे. त्याला कारणीभूत विचार आहेत. विचार हा शब्द तसा व्यापक आहे. "विचार ही एक शक्ती आहे. ती स्वतंत्र आहे. स्वनिर्धारित आहे. तिचे नियम तीच ठरवू शकते. पाण्याला स्नान घालावे लागत नाही. वाहता वाहता ते निवळत जाते. विचारांचे तसेच आहे."[१] नैसर्गिक व मानसिक आपत्तींतून एखाद्या वेळेस माणूस सावरू शकतो; परंतु वैचारिक आपत्तीतून सावरणे अवघड असते. वैचारिक आपत्ती ही अनेक पिढ्या उद्ध्वस्त करीत असते. वैचारिक दारिद्र्य गुलामगिरीला जन्म देते. राष्ट्राचा विकास भौतिक साधनेवर, लोकसंख्येवर व लांबी-रुंदीवर अवलंबून नसतो. वैचारिक श्रीमंती हीच ख-या अर्थाने राष्ट्राची श्रीमंती असते. त्यामुळे वैचारिक शक्तीचा विकास व्हायला हवा. विचाराची उपेक्षा न करता चिकित्सा होणे हे गरजेचे आहे.

विचाराचे नाते श्रद्धेशी आहे. डोळस श्रद्धा माणसाला तारू शकते. व्यक्ती, वस्तू व मूल्यांवर आपली निष्ठा असेल तरच आपण चांगला विचार करतो. विचारातून श्रद्धा व श्रद्धेतून विचाराची वाढ होत जाते. यासंबंधी प्रसिद्ध विचारवंत मे. पुं. रेगे लिहितात, "व्यक्तीच्या वैचारिक जीवनाचा प्रारंभ श्रद्धेपासून होणे अटळ आहे; कारण लहान मुले स्वतंत्रपणे विचार करून स्वतःची मते घडवू शकतील, अशी त्यांची स्थिती नसते. श्रद्धा ही अखेरीस स्वतःच्या सामाजिक परंपरेवरील श्रद्धा असते. वाढणा-या मुलाची आणि अनेकदा प्रौढ माणसाची प्रारंभिक श्रद्धास्थाने ही सामाजिक श्रद्धास्थाने असतात. पण वाढणारे मूल स्वतः विचार करू लागल्यावर त्याची वैयक्तिक श्रद्धास्थानेही निर्माण होऊ शकतात."[२] माहिती--तंत्रज्ञानाच्या युगात यंत्रच काम करीत असल्यामुळे माणूस विचारापासून व श्रद्धेपासून दूर जात आहे. एकविसाव्या शतकातला हा एक नैतिक पेचप्रसंग आहे. उद्योगीकरण व माहिती तंत्रज्ञानापेक्षाही भारताचे प्रबोधन विचारवंतांमुळे झाले आहे. विचारवंतांमुळे माणसं जोडली गेली. माणूस हीच एकमेव जात आहे याची जाणीव विवेकामुळे होते. विचाराची नाती रक्ताच्या नात्यापेक्षा अधिक घट्ट असतात.

विचारवंत कोणास म्हणावे? विचारवंतांचे प्रयोजन कोणते?, समाजाची वैचारिकता म्हणजे काय? वैचारिक साहित्य कशाला म्हणावे? अगदी बोटावर मोजण्याइतक्या अभ्यासकांनीच याविषयी लेखन केले. मराठीत वैचारिक

अनुक्रमणिका

साहित्यावर अजूनही लेखन व संशोधन म्हणावे तितके झाले नाही. कथा, कादंबरी, नाटक व कविता या वाङ्मय-प्रकारांप्रमाणे वैचारिक साहित्याची संकल्पना मराठीत स्पष्ट झालेली दिसत नाही. आधुनिक मराठी साहित्यातील नवसाहित्याच्या काळात 'ललित गद्य' व 'ललित निबंध' हा शब्दप्रयोग रूढअर्थाने प्रचलित झाला. त्याची संकल्पना समीक्षकानी स्पष्ट केली; परंतु नवसाहित्याच्या कितीतरी वर्षे आधी महाराष्ट्रात वैचारिक गद्याची व निबंधाची एक अजोड परंपरा निर्माण झाली होती. असे असतानाही 'वैचारिक साहित्य' या संकल्पनेची दखल मात्र कुणी घेतली नाही.

मानवी जीवनात वैचारिक पोकळी निर्माण झाली, तर मानवाला आनंदाने जीवन जगता येत नाही. माणसाची वैचारिक उंची वाढत गेली, तर स्वतःचे व समाजाचे प्रबोधन होऊ शकते. वैचारिक संस्कारामूळे माणूस माणुसकीच्या मार्गाने जातो. आज माणूस दिवसेंदिवस वैचारिक दृष्ट्या दुबळा बनत चालला आहे. वैचारिक प्रगतीमुळे जीवनमूल्ये रुजत जातात. विचारवंतांची संख्या वाढत आहे, पण विचारात म्हणावी तितकी प्रगती झाली नाही; विचारवंत जन्माला येत आहेत, परंतु समाजाची सुधारणा होत नाही. या विसंगतीचा शोध घेणे गरजेचे आहे. "विचारांच्या स्थैर्यासोबत कार्यातही स्थैर्य हवे. विचारांचे स्थैर्य असेल तरच कृतीत स्थैर्य येते. विचार आणि कृती (Thought and action) हे जीवनाचे पंख आहेत."[३] विचार व कृती याचे पारडे समान असेल तरच परिवर्तन शक्य आहे. परंतु विचारशील असलेला प्रत्येक माणूस कृतिशील असतोच, असे नाही. विचाराला कृतीची जोड हवी.

ज्याच्याकडे स्वतःची अशी विचारशक्ती व मूल्यदृष्टी आहे. त्याला विचारवंत म्हणता येईल. विचार चिंतनातून जन्माला येत असतो. विचारवंत विचारशक्तीचा नेहमीच सृजनात्मक उपयोग करतो. खऱ्या विचारवंताच्या अंगातील अणुरेणूंत विचार भरलेला असतो. तो मन, बुद्धी व मेंदूसहित सर्वांगानी विचार करतो. विचारवंत काळासोबत जात सत्याला सामोरे जातो. विचार त्याच्या जगण्याच्या प्रक्रियेचा अविभाज्य घटक असतो. खरा विचारवंत वर्तमानाला कवेत घेतो. आपण ज्यांना विचारवंत म्हणतो-ते सगळेच विचारवंत नाहीत. काही सोयीचे, काही रंग बदलणारे तर काही इतरांच्या विचार व कार्याचा प्रचार आणि प्रसार करणारे विचारवंत आहेत. पन्नास वर्षांपूर्वी मांडलेली कल्पना व सांगितलेला विचार पुन्हा सांगणारे विचारवंत भरपूर आहेत. समाजात ज्या काही घटना घडतात व समस्या उभ्या राहतात, त्यांचे निराकरण करण्यासाठी जो नवीन समाजोपयोगी विचार मांडतो, त्याला विचारवंत म्हणता येईल. तटस्थ राहून वर्तमानकाळाशी मतप्रदर्शन करणे, हे विचारवंतांचे प्रमुख कार्य आहे. "आजचा मराठी समाज आणि वैचारिकता" या लेखात अरुण टिकेकर यांनी विचारवंतांची काही लक्षणे सांगितली आहेत. "समाजाच्या सांस्कृतिक -वैचारिक-भावनिक संचिताचं म्हणजे परंपरेचं पूर्ण भान असणारा, सामाजिक न्यायाचा पुरस्कर्ता या नात्यानं अन्यायी परंपरांना प्रत्यक्षपणे तसेच विचारसृष्टी मोडीत काढणारा, नवविचार प्रसृत करणारा, त्यांचं स्वागत करणारा, इतरांना विचारदृष्ट्या सक्षम करणारा, प्रवाहपतित न होणारा, प्रत्येक बाबतीत स्वतःला होणाऱ्या लाभाची मनीषा न धरणारा, समाजाचं विचारस्वातंत्र्य अबाधित राखण्याचा अटोकाट प्रयत्न करणारा, इतरांना त्यासाठी उद्युक्त करणारा, सदैव सत्याची पाठराखण करणारा, एखाद्या महत्त्वाच्या घटनेवर वा दुर्घटनेवर भाष्य करावयास न कचरणारा आणि आपल्या मताची किंमत द्यावयाची तयारी असणारा, समाजातील 'नाही रे' चा प्रतिनिधी अशी काहीशी विचारवंतांची लक्षणं असल्याचं मानता येईल."[४] सर्वसामान्यांविषयी कळवळा हे विचारवंतांचे खरे लक्षण होय. 'बुडती हे जन....' याच कळवळयातून विचारवंतांना वाटचाल करावी लागते. भवितव्यासाठीचा आशावाद, सम्यक व विवेकदृष्टी त्याचबरोबर समाजाविषयी जिव्हाळा नसेल तर स्वातंत्र्य, समता, न्याय व बंधुतेच्या आधारावर मानवी संस्कृतीचा सेतू विचारवंतांला बांधता येणार नाही.

विचारवंताला 'थिंकर' व 'इन्टेलेक्च्युअल' असे पर्यायी शब्द आहेत. या इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द म्हणून 'विचारवंत' हा शब्द वापरला जातो. आपल्या देशात यापूर्वी 'आचार्य' हा शब्द वापरला जात असे. पंडित शब्द 'आचार्य' या शब्दाला पर्यायी शब्द होऊ

शकत नाही. विचाराबरोबरच आचरणाला महत्त्व देऊन 'बहुजन हिताय बहुजन सुखाय' या समर्पित भावनेने काम करणा-या, आपल्या विषयात निष्णात असलेल्या व्यक्तीस आचार्य म्हणता येईल. हा शब्द विचारवंताच्या जवळ जाणारा आहे. पूर्वीचे आचार्य पौराणिक ग्रंथांच्या आधारे विवेचन करीत असत. आजचे विचारवंत समाजशास्त्र, साहित्य, कला, राज्यशास्त्र, इतिहास, शिक्षण, अर्थशास्त्र व तत्त्वज्ञानाच्या अनुषंगाचे वर्तमानकाळ डोळ्यांसमोर ठेवून विचार मांडीत आहेत.

मो. वि. भाटवडेकर यांच्या 'मराठी पर्यायी शब्दांचा कोश' यामध्ये विचार या शब्दाचा अर्थ "बेत, मत, मनसुबा, मनोदय, हेतू, अभ्यासपूर्वक चिंतन, चर्चा, तारतम्य बुद्धी, मनन, विवेक;"[५] विचारवंत या शब्दाचा अर्थ "विचारशील, विचारी, विवेकी, समंजस, सुज्ञ" [६] असा दिला आहे. विचारवंताला 'Thoughtful' असाही शब्द आहे. म्हणजेच विचारवंत हा विचारमग्न असतो. Oxford Advanced Learner's Dictionary मध्ये विचार म्हणजेच Thought या शब्दाचा अर्थ, "A person's mind and all the ideas that they have in it when they are thinking"[७] असा सांगितला गेला आहे. व्यक्तीच्या मनातील कल्पना म्हणजे विचारअसा वरील वाक्याचा अर्थ आहे. विचारवंतदेखील कल्पक असतो. म्हणजेच वैचारिक साहित्य हे देखील सृजनशील साहित्य नाही का? "तात्त्विक अथवा वैचारिक लेखन हे देखील नवसर्जन असते. विचारांच्या नवनिर्मितीसाठी तीव्र बुद्धिमत्ता, तर्कबुद्धी, सापेक्ष व विश्लेषक दृष्टी आणि उच्च कल्पनाशक्ती, वस्तुनिष्ठ दृष्टी असावी लागते. तत्त्व अथवा विचारांच्या क्षेत्रात मानवी प्रज्ञाशक्ती नवे भावनात्मक सहसंबंध शोधण्याऐवजी तार्किक, कार्यकारण भावात्मक वस्तुनिष्ठ सहसंबंध शोधते."[८] वैचारिक दृष्ट्या कार्यप्रवण असलेले विचारवंत (इंटलेक्च्युअल) असतात. सुधीर बेडेकर यांसारख्या अभ्यासकांनी विचारवंतांत तत्त्वज्ञ, साहित्यिक, पंडित (स्कॉलर), शास्त्री आणि प्रबोधक अशा वेगवेगळ्या प्रकारच्या लोकांचा समावेश केलेला आहे. प्रबोधनासाठी जे कार्यकर्ते लागतात, ते प्रामुख्याने लोकशिक्षक असतात. विचारवंत हा शब्द या अर्थी सामान्यपणे वापरला जातो; पण त्यांना 'प्रबोधक' म्हणणे अधिक योग्य ठरेल, असे बेडेकर यांना वाटते. भालचंद्र भगणे संपादित समाज प्रबोधन पत्रिकेच्या सप्टें./ ऑक्टो. (१९७६) मधील अंकात बेडेकरांचा "प्रबोधन : ज्ञानेश्वरांच्या सातशेव्या जन्मदिनानिमित्ताने" हा लेख प्रकाशित झाला. त्यात त्यांनी विचारवंताविषयी भाष्य केले आहे.

बुद्धीचा वापर करणा-यालाच विचारवंत म्हणता येत नाही. "विचारवंत आणि समाज" या लेखात वसंत पळशीकर यांनी केलेली चर्चा महत्त्वाची वाटते. "तल्लख बुद्धीचा वकील जेव्हा त्याच्या पक्षकाराच्या बाजूने समर्थ युक्तिवाद करीत असतो, तेंव्हा तो विचारवंताच्या भूमिकेत बहुधा नसतो. काही वेळेस पक्षकाराची बाजूही विचारवंताच्या भूमिकेतून मांडली जाते, ही गोष्ट वेगळी. तात्पर्य, बुद्धीचा तल्लख, भेदक, प्रभावी वापर, तर्ककठोर युक्तिवाद यांच्या आधारे मांडणी करणारा प्रत्येकजण 'विचारवंत' या पदवीला पोचू शकत नाही. तसेच एखाद्या शास्त्राच्या चौकटीत तज्ज्ञपंडित या नात्याने केलेली मांडणी ही ती मांडणी करणा-यास 'विचारवंत' या पदवीस पोचवू शकत नाही."[९] विचारवंत समाजाशी जोडला गेला असावा. समाजापासून विचारवंताची नाळ तुटलेली असेल, तर त्याला विचारवंत म्हणता येणार नाही. असे पळशीकरांना सांगावयाचे असेल. १० नोंव्हेबर १९२५ च्या 'निजाम विजय' साप्ताहिक पत्रात न्या. केशवराव यांचा "विचारलहरी" नावाचा लेख प्रकाशित झाला. त्या लेखात ज्ञानाविषयी ते म्हणतात, "नुसते स्वतःज्ञान संपादन करणे हा अप्पलपोटेपणा आहे. ज्या प्रकाशाने आपले डोळे उघडले गेले, त्याच प्रकाशाने आपल्या लोकांचे डोळे उघडावेत. आपण ज्ञानी होऊन समाधिस्थ झालो तर उपयोगात न आणलेली अलोट संपत्ती बाळगण्यासारखे होईल."[१०] केवळ स्वयंप्रकाशित होऊन चालत नाही, तर इतरांना प्रकाशित करणे हीच खरी माणुसकी होय. ज्ञान हे इतरांना दिल्यामुळे वाढत जाते. त्यामुळे ज्ञानाची संपत्ती अवश्य बाळगावी. परंतु ती संपत्ती स्वतःपुरतीच मर्यादित ठेवू नये ज्ञान संपादन करून आपली बौद्धिक पातळी वाढविणारे विचारवंत सामान्य माणसाच्या उपयोगाचे नसतात. संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे, शब्दाचे धन आपण सतत वाटले पाहिजे. वर्तमानकाळाशी

सुसंगत माहिती गोळा करीत ज्ञान ग्रहण करून त्यात आपल्या नवीन विचारांची भर घालीत समाजाच्या प्रक्रियेत सामील होऊन समाजाची विस्कटलेली घडी बसविणा-यालाच खरा विचारवंत म्हणता येईल. विचारवंत हा समाजहितवादी असतो. व्यक्तिगत वैचारिक उंचीबरोबरच समाजाची वैचारिक उंची वाढली पाहिजे, असे त्याला सतत वाटत असते.

वैचारिकता हा शब्द "liberality (उदारता)"[११] या अर्थाने वापरला गेला. 'liberalism' ला मराठी पर्यायी शब्द 'उदारमतवाद' असा आहे. एकंदरीत विचारवंतांच्या मार्गदर्शनामुळे समाजमनातील दुर्मतांचा व दुर्विचारांचा मळ नाहीसा झाला पाहिजे. उदारमतवादी दृष्टिकोण असल्याशिवाय हे शक्य नाही. विचारवंताला अनेकदा सैद्धांतिक मांडणी करावी लागते. वैचारिकता नसताना वैचारिक मुखवटे धारण करणा-यापासून सावध राहणे गरजेचे आहे. सर्वसामान्य अज्ञानी माणूस ढोंगी विचारवंताच्या वैचारिक थैमानातून वाचू शकणार नाही. यासाठी प्रत्येकाने विचारशील होणे गरजेचे आहे.

सामान्य माणसाला वैचारिक दृष्ट्या सुदृढ करणे विचारवंताचे काम आहे. डॉ. यश वेलणकर यांनी म्हटल्याप्रमाणे, "Use it or lose it हा निसर्गनियम आहे. आपल्या मेंदूचे वार्धक्य टाळायचे असेल, त्याला निरोगी व सक्रिय ठेवायचे असेल तर, त्याला वैचारिक खाद्य द्यायला हवे. त्याला एखाद्या प्रश्नाला अनेक अंगांनी विचार करायला लावायला हवा, माहिती समजून घेऊन तीवर प्रक्रिया करण्याची सवय कायम ठेवायला हवी."[१२] वस्तूचा वापर केल्यानंतर ती वस्तू झिजते, त्यामुळे इतरांचा फायदा होतो. स्वतःलाही आनंद होतो. वस्तूचा वापर न केल्यास ती कुजण्याची शक्यता असते. कुजण्यापेक्षा झिजणे केव्हाही चांगले असते. मेंदूचा वापर न केल्यास ती गमावून बसण्याची दाट शक्यता असते. मेंदूचा वापर करणे म्हणजे मेंदूला वैचारिक खाद्य पुरविणे होय. परिस्थिती लक्षात घेऊन विचारवंत हे कार्य करीत असतो. दुस-याच्या दुःखाने दुःखी होणारा विचारवंतच खरा विचारवंत होय. प्रत्येक माणसात वैचारिक अंश असतो. आपण अंतर्मुख होऊन सम्यकदृष्टीने स्वतःकडे पाहत नाही. माणसात असलेल्या वैचारिक अंशाला प्रेरणा देण्याचे काम विचारवंताचे आहे. विचाराशी प्रामाणिक असलेल्या विचारवंतांकडून प्रबोधनाचे काम प्रभाविपणे होत असते. विचारवंत हा समाजाचा सारथी असतो; नव्हे, तर तो समाजाची सदसद्विवेकबुद्धीच असतो.

वैचारिक साहित्य म्हणजे केवळ पंडित किंवा संशोधकांचं साहित्य नव्हे; तर प्रज्ञावंतांचं साहित्य होय. समाजात ज्ञानवंत मोठ्या प्रमाणात आहेत; पण प्रज्ञावंत व निष्ठावंत मात्र फार कमी आहेत. ज्ञानी माणसाची विद्वत्ता ही सर्वसामान्य माणसाच्या उपयोगाची असतेच असे नाही. ज्याची विद्वत्ता सामान्यांतल्या सामान्य माणसाच्या उपयोगी ठरते. त्याला प्रज्ञावंत म्हणता येईल. सगळेच ज्ञानवंत प्रज्ञावंत असतातच असे नाही; परंतु प्रज्ञावंत हा ज्ञानवंत असू शकतो. प्रज्ञावंत हा तितकासा ज्ञानवंत नसला तरी तो समाज व राष्ट्रहिताच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो. प्रज्ञावंत सुशिक्षित नसला, तरी त्याला अडाणी म्हणता येणार नाही. प्रज्ञा, शील व करुणेने ज्याचे व्यक्तिमत्त्व ओथंबलेले असते, अशा व्यक्तींचे शब्द मुखातून बाहेर पडून जेव्हा लेखणीचे रूप धारण करतात, तेव्हा त्याचे रूपांतर वैचारिक साहित्यात होते. ज्ञानाला विवेकाची जोड मिळाल्यानंतर मनुष्य प्रज्ञावंत होतो. ज्ञानाला मूल्यांची जोड दिली म्हणजे 'बुद्धिमत्ता' ही विवेकबुद्धीत रूपांतरित होते.

अन्न, वस्त्र व निवारा या मूलभूत गरजांची परिपूर्ती झाल्यावर माणूस सुखी होईलच, असे नाही. माणसाला केवळ पोटाची व वासनेची भूक असत नाही, तर विचाराचीही भूक असते. मार्गदर्शक विचारातून जीवनाचा मार्ग व्यवस्थितपणे काढता येतो. विचारवंत वैचारिक साहित्याच्या माध्यमातून विचाररूपी खाद्य पुरवून माणसाचे जीवन समृद्ध करीत असतो. दिशा नसलेल्या, दशा झालेल्या दिशाभूल माणसाच्या हृदयात पणती पेटवून विचारवंत माणसाचे जीवन प्रकाशमान व सुगंधित करतो.

सर्व वाङ्मयप्रकारांत असून सगळ्यांपेक्षा वेगळं असलेलं साहित्य म्हणजे वैचारिक साहित्य होय. समाजमन घडविण्याबरोबरच सामाजिक चळवळींना गतिमान करण्याचे काम वैचारिक साहित्य करीत असते. हे साहित्य माणुसकीचा नंदादीप सतत तेवत ठेवते. विचार हा वैचारिक

अनुक्रमणिका

साहित्याचा आत्मा असतो. विचारामुळे संस्कृतीची श्रीमंती वाढते. विचारशक्तीचा थोड्याफार प्रमाणात सृजनात्मक वापर करून चिंतनरूपाने सुलभ भाषेत मांडून वर्तमानकाळावर लिहिलं जातं. त्याचा समावेश वैचारिक साहित्यात करता येईल. विचारवंत हा एक प्रकारे समाजाचा प्रतिनिधी असतो. "अभिजात विचारवंत आपल्या हाती एखादे 'समीक्षासूत्र' देतो. त्याचा आधार घेऊन अनेक प्रश्नांचे विश्लेषण करण्याची दृष्टी आपल्याला मिळते."[१३] विचारवंतामुळे सामान्य माणसाला दृष्टी प्राप्त होते व दिशाही मिळते.

माणसातील अस्मिता व तेजस्विता जागृत करणे ही विचारवंताची भूमिका असावी. अंधारात राहणा-या लोकांना प्रकाशात आणणे हे विचारवंताचे आद्य कर्तव्य आहे. "एका अर्थाने विचारवंत म्हणजे एक अस्वस्थ आत्माच. अगदी अश्वत्थाम्यासारखा. सतत भळभळणारी जखम घेऊन जगणारा, पण जीवनाबद्दल कसलीच निराशा न बाळगणारा. त्यामुळे विचारवंत हा व्यवस्थेची केवळ व्याख्या करून थांबत नसतो, तर त्याच्या नवनिर्मितीसाठी धडपडत असतो,"[१४] असे डॉ. सूर्यनारायण रणसुभे यांनी म्हटले आहे. नवनिर्मितीसाठी धडपडत असतानाच वैचारिक साहित्य जन्माला येते.

वैचारिक साहित्यात राजकारण, धर्मकारण, समाजचिंतन, शिक्षण, अर्थकारण, तत्त्वज्ञान आदींचा सुरेख संगम झालेला आहे. वैचारिक साहित्याला कुठलेच क्षेत्र व विषय वर्ज्य नसतो. सर्व समस्यांवर भाष्य करीत, समाजाला जागे करून आत्मभान निर्माण करणारे साहित्य म्हणून वैचारिक साहित्याचा उल्लेख करता येईल. कादंबरी, नाटक व निबंध यांसारखे वाङ्मयप्रकार इंग्रजी साहित्याच्या अनुकरणातून निर्माण झाले. निबंध आणि वैचारिक साहित्य एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एकोणिसाव्या शतकात इंग्रजी साहित्याचा अभ्यास काही मराठी माणसांनी केला. त्यातून भाषांतरित साहित्य येऊ लागले. नियतकालिके निघाली. त्यातून निबंधलेखनास प्रारंभ झाला. वैचारिक साहित्य ब्रिटिशांच्या आगमनानंतरच लिहिले जाऊ लागले, असे म्हणणेदेखील संयुक्तिक ठरणार नाही. विचार फक्त गद्यातूनच नव्हे तर पद्यातूनही येत असतो. या दृष्टीने विचार केल्यास मध्ययुगीन संतसाहित्य वैचारिक साहित्यात मोडते. म्हणून वैचारिक साहित्याला मराठीत जुनी परंपरा आहे.

हजारो वर्षांपासून वैचारिक साहित्याची निर्मिती होत असेल, तर मग समाजाची सुधारणा अजूनही का झाली नाही, असा प्रश्न जेव्हा पडतो, तेव्हा त्याचे उत्तर शोधत असताना काही विचारवंतांच्या अंतर्मनाचा विचार करावा लागेल. माणूस दिसतो तसा नसतो. माणसाला ओळखणे अतिशय अवघड काम आहे. सत्ता, संपत्ती, भौतिक सुविधा इत्यादींबद्दल मोह, स्वार्थ ठेवून जर विचारवंत वाटचाल करीत असेल, तर समाजमनावर विचारवंताचा परिणाम कसा होईल? हक्क आणि कर्तव्य यांचे पारडे समान असावे लागते. यामध्ये काही विसंगती विचारवंतांमध्ये पाहावयास मिळते. उक्तीपेक्षाही कृतीचा परिणाम माणसावर तात्काळ होतो. आजतरी बोलक्या विचारवंतांची नाही, तर कर्त्या विचारवंतांची गरज आहे. माणसाची विवेकबुद्धी जागी असेल, तर त्याला सत्याचा शोध वैचारिक साहित्यातून नीटपणे घेता येतो. वैचारिक संस्कृती निर्माण व्हावी असे वाटत असेल, तर मतभेद होणारच. यात शंका नाही. संपत्ती शासनाला बळ पुरवील व शस्त्र त्याचे रक्षण करील; परंतु स्वामित्व विचारांचेच राहते.

विचारवंतांचा विचार हा अखिल मानवजातीच्या कल्याणासाठीच असतो. मर्यादित व संकुचित विचार करून विचार मांडणा-या विचारवंतांच्या साहित्याला वैचारिक साहित्य म्हणणे चुकीचे आहे. वैचारिक साहित्य म्हणजे प्रबोधनाचे साहित्य व परिवर्तनवादी साहित्य होय. वैचारिक मीमांसा, बौद्धिक चिकित्सा व आचार यांचा संगम विचारवंताच्या व्यक्तिमत्त्वात व लेखनशैलीत झाल्यास, ते वैचारिक साहित्य परिणामकारक ठरते. तसे पाहिले तर प्रत्येक व्यक्ती आपल्या बालपणापासून स्वतःचं असं एक वैचारिक विश्व निर्माण करीत असते. एकंदरीत विचाराला चालना व प्रेरणा देणारे साहित्य म्हणजे वैचारिक साहित्य होय. गावोगावी समाजाचा विकास व्हावा म्हणून समाजमंदिरे बांधली जात आहेत. अशा मंदिरांमुळेच ग्रामीण भागाचा विकास झाला का?

